# ज्ञानेश्वरी

## अध्याय चौथा

[ राजवाडे संहिता आणि सरकारी प्रत ]

*************************************

चौथ्या अध्यायातून उपस्थित होणाऱ्या

वाङ्मयीन व व्याकरणविषयक प्रश्नांच्या चर्चेसह

*************************************

संपादक

माधव गोपाळ देशमुख

सुविचार प्रकाशन मंडळ

मूल्य पाच रुपये



प्रकाशक
श्यामकान्त बनहट्टी
सुविचार प्रकाशन मंडळ,
धनतोली, नागपूर १२
सदाशिव पेठ, पुणे ३०

प्रथम आवृत्ती : १९५८
द्वितीय आवृत्ती : १९७१


मुद्रक :
श्यामकान्त बनहट्टी,
श्रीनिवास मुद्रणालय,
सुविचार प्रकाशन इमारत,
धनतोली, नागपूर १२

## याच ग्रंथकाराचे लेखन

१ मराठीचे साहित्यशास्त्र
ज्ञानेश्वर ते रामदास (तृ. आ.)

२ भावगंध (द्वि. आ.)

३ वाङ्मयीन व्यक्ती

४ नामदेव (साहित्य अकादमी)

## संपादन

नागेशकृत–सीतास्वयंवर
एकादशी, गद्यमाला, गद्यबंध इ०
नवे पान : (दत्तांची कविता)

# प्रस्तावना

ज्ञानेश्वरी अध्याय चौथा ( राजवाडे संहिता ) हे संपादन १९५८ मध्ये प्रकाशित झाल्यानंतर १९६० मध्ये राजवाडे संहितेची दुसरी आवृत्ती (सरकारी प्रत) प्रकाशित करण्यात आली.

या नव्या आवृत्तीत राजवाडे संहितेबरोबर, सरकारी प्रतीतील पाठभेद आणि इतर प्रतींमधलि महत्त्वाचे पाठ पदटीपेत नमूद केलेले आढळतील. मात्र राजवाडे संहितेत जेथे जेथे ' ल ' आहे त्याऐवजी सरकारी प्रतीत ' ळ ' घातलेला दिसतो त्याचा प्रत्येक ठिकाणी वेगळा उल्लेख केलेला नाही.

या संपादनाच्या प्रथमावृत्तीच्या वेळी मराठी साहित्य महामंडळाचे लेखन-विषयक नियम उपलब्ध आणि अधिमान्य झालेले नव्हते. नव्या आवृत्तीत ज्ञानेश्वरीच्या संहितेखेरीज सर्वत्र हे नवे नियम वापरले आहेत.

या आवृत्तीच्या प्रकाशनाचे कार्य नागपूर-पुणे येथील सुविचार प्रकाशन मंडळाचे श्री. श्यामकान्त बनहट्टी यांनी सुबक रीतीने करून दिले याबद्दल त्यांना हार्दिक धन्यवाद.

ही दुसरी आवृत्ती अभ्यासकांना सहायक होईल अशी आशा वाटते.

डिसेंबर १९७०



# पहिल्या आवृत्तीची प्रस्तावना

नागपूर विद्यापीठाने १९६० या वर्षापासून बी. ए. पदवीपरीक्षेच्या अभ्यासक्रमात ज्ञानेश्वरीच्या चौथ्या अध्यायाचा समावेश केला आहे. या निमित्ताने ज्ञानेश्वरीच्या सर्वसामान्य अभ्यासकांस साहाय्य व्हावे म्हणून, आणि विशेषतः पदवीपरीक्षेस बसणाऱ्या विद्यार्थ्यांना ज्या तऱ्हेचे प्रश्न सोडवावे लागतात त्या धोरणाने हे पुस्तक तयार करण्यात आले आहे.

प्रथमतः ज्ञानेश्वर व ज्ञानेश्वरी यांविषयी सामान्य माहिती देऊन, चौथ्या अध्यायाचा प्रतिपाद्य विषय, ज्ञानेश्वरीची भूमिका, मूलानुसरण व सामाजिक परिस्थितीचे प्रतिबिंब हे विषय चर्चिले आहेत. नंतर काव्यसौंदर्याची उकल केली आहे व चौथ्या अध्यायातील अलंकार, व्याकरण, व्युत्पत्ती आणि वाक्प्रचार यांची भरपूर माहिती दिली आहे.

चौथ्या अध्यायाचे संपादन करताना प्रथम गीतेचा श्लोक, त्यावरील गीताई, व नंतर ज्ञानेश्वरीची राजवाडे-संहिता देऊन प्रत्येक पृष्ठावर येणाऱ्या ज्ञानेश्वरीच्या ओव्यांचा सुबोध अर्थ व शब्दांवरील टीपा त्या पृष्ठाच्या तळाशी दिलेल्या आहेत. या योजनेचा उद्देश असा की, अभ्यासकाला प्रत्येक पृष्ठावर ओव्या आणि त्यांवरील स्पष्टीकरण डोळ्यांसमोर दिसावे. ही योजना आजवर प्रसिद्ध झालेल्या ज्ञानेश्वरीवरील सटीप आवृत्त्यांपेक्षा काहीशी निराळी आहे आणि ती अभ्यासकांना सोयीस्कर ठरेल अशी आशा आहे.

ही आवृत्ती तयार करताना आमचे स्नेही श्री. रामदास डांगे, बी. ए. (मराठीचे सुवर्णपदक विजेते) यांची लेखक म्हणून योजना केली होती; परंतु ते 'लेखकू'चे काम करता करता ग्रंथाच्या रचनेतही सहभागी झाले. या त्यांच्या उभयविध साहाय्याबद्दल मनःपूर्वक आभार मानतो. श्री. डांगे यांच्या प्रत्यक्ष साहाय्याशिवाय अप्रत्यक्षपणे अनेक पूर्वसूरींचे ऋण या पुस्तकात जागोजागी घेतले आहे. पू. विनोबाजींची 'गीताई' ही उद्धृत करण्याची प्रेरणा गुरुवर्य प्रा. श्री. ना. बनहट्टी यांच्या 'ज्ञानेश्वरी तिसरा अध्याय' या ग्रंथाने दिली. या आणि इतरही अनेक ज्येष्ठ व श्रेष्ठ आचार्यांचा व भाष्यकारांचा ऋणनिर्देश करण्यापेक्षा ते ऋण सर्व अभ्यासकांच्या शिरांवर अधिकाधिक वाढावे, एवढेच मागणे आहे.

● ● ●

# अनुक्रमणिका



* *

# १. वाङ्मयसृष्टीतील अलौकिक चमत्कार !

'ज्ञानेश्वरी' हा ग्रंथ मराठी ग्रंथरत्नभांडारातील कोहिनूर आहे. आज सहा-सातशे वर्षे होऊन गेली परंतु मराठी वाङ्मयाच्या विश्वात या ग्रंथाचे अधिराज्य आजही कायम आहे. महाराष्ट्र—सारस्वतात श्री. वि. ल. भावे यांनी म्हटल्याप्रमाणे ही ज्ञानदेवाची कृती ज्ञानेश्वरीही आहे, वागीश्वरीही आहे. इतकेच नव्हे तर ती धर्मक्षेत्र आहे, व काव्यगंगाही आहे. सर्वांचे आदिस्थान असा हा ग्रंथ वाचून शास्त्राचा प्रांत निराळा व काव्याचा प्रांत निराळा, बुद्धीची प्रगल्भता व कल्पनाविलास यांचे एकाधिकरणत्व वस्तुगत्याच शक्य नाही, ज्ञानाचा आणि काव्याचा नेहमी विरोध असतो, धार्मिक शिक्षण देणारा ग्रंथ काव्यमय होणार नाही इत्यादी कल्पना सोडणे भाग पडते.

ज्ञानेश्वरी या ग्रंथाचे स्वरूप जितके अलौकिक आणि चमत्कारजनक आहे तितकेच, किंबहुना त्याहूनही अधिक अलौकिक आणि चमत्कारजनक असे ज्ञानेश्वरांचे चरित्र आहे. त्यांच्या चरित्राकडे पाहणाराची 'आश्चर्यवत् पश्यति कश्चिदेनम्' अशी स्थिती होते. ज्ञानेश्वरांचा जन्म केव्हा व कोठे झाला ? त्यांचे मूळनाव विद्याधर की ज्ञानदेव ? त्यांच्या वडिलांचे नाव काय ? ज्ञानेश्वर एक की दोन ? असे अनेक वाद निर्माण झाले आहेत. आणि अजूनही या सर्व वादांचा निकाल लागला आहे असे म्हणता येत नाही. किंबहुना विठ्ठल-रुक्मिणी या जोडप्यास निवृत्ती, ज्ञान, सोपान, व मुक्ताई ही अपत्ये म्हणजे आधी निवृत्ती, मग ज्ञान, नंतर ज्ञानाच्या सोपानाने (मार्गाने) मुक्ती अशी रूपकात्मक भाषा तर नाही ना, असाही तर्क केला जातो. ज्ञानेश्वरीची रचना

> शके बाराशतें बारोत्तरें । तैं टीका केली ज्ञानेश्वरें
>
> सच्चिदानंदबाबा आदरें । लेखकु जाला ।।

या ज्ञानेश्वरीच्या शेवटी दिलेल्या ओवीनुसार शके बाराशे बारा म्हणजे इ. स. १२९० मध्ये लिहिली गेली असे अनुमान निघते. परंतु त्यांचे

जन्मस्थळ, जन्मशक व समाधिशक याविषयी मात्र त्यांच्या चरित्रकारांत अनेक मतभेद आहेत.

तेथ यदुवंशविलासु । जो सकळकळां निवासु
न्यायातें पोखीत क्षितीशु । श्रीरामचंद्रु ॥ १८. १७८३ ॥

या ओवीवरून ज्ञानेश्वर हे रामदेवराव जाधव यांच्या कारकीर्दीत होऊन गेले एवढे निश्चितपणे म्हणता येते. ज्ञानेश्वरीची रचना वयाच्या केवळ पंधराव्या वर्षी केली हाच वाङ्मयसृष्टीतील एवढामोठा कअलौकि चमत्कार आहे की त्यापुढे त्यांच्या लौकिक चरित्रात दिलेले रेड्याकडून वेद वदवणे व भिंत चालवणे हे चमत्कार काहीच नव्हेत.

* *

## २. ज्ञानेश्वरी चौथ्या अध्यायाचा प्रतिपाद्य विषय :

### ज्ञानयुक्त कर्म

गीतेच्या प्रत्येक अध्यायाच्या शेवटी 'इति श्रीमद्भगवद्गीतायां ..' अशी उपसंहारात्मक प्रशस्ती असून तीत त्या त्या अध्यायाचे नाव दिलेले आहे. त्यावरून त्या अध्यायचा विषय काय आहे हे लक्षात येते. पण गीतेच्या निरनिराळ्या प्रतीत निरनिराळी नावे दिलेली आहेत. लो. टिळकांच्या गीतारहस्यात 'ज्ञानकर्मसंन्यासयोग' हे नाव आहे तर गीतेच्या इतर प्रतीत ते 'ब्रह्मार्पणयोग' असे आहे. इतिहासाचार्य राजवाडे यांच्या मुकुंदराजी प्रतीत मात्र 'ज्ञानयोग' असे नाव दिलेले आहे.

ज्ञानेश्वरीच्या प्रतिपाद्य विषयाचा विचार करण्यापूर्वी संपूर्ण ज्ञानेश्वरीत चवथ्या अध्यायाचे स्थान कोणते या दृष्टीने ज्ञानेश्वरांचा दृष्टिकोण समजावून घेतला पाहिजे. अठराव्या अध्यायात म्हटल्याप्रमाणे, श्रीकृष्णाने प्रकट केलेले गीताशास्त्र हे वेदांचे मूलसूत्र असून ह्या गीताशास्त्रात कांडत्रयात्मक वेद बीजरूपाने ग्रथित झाले आहेत. अठरा अध्यायांपैकी ३ ते ११ कर्मकांड असून या अध्यायांत प्रसंगोपात्त 'उपासनाकांड' (देवताकांड) वर्णिले आहे. ज्ञानेश्वरांच्या मते पहिल्यात 'शास्त्रप्रवृत्तिप्रस्ताव' असून दुसऱ्यात 'सांख्यसद्भावप्रकाशन' आहे. अठरावा उपसंहारात्मक असून सोळावा

व सतरावा हे अध्याय पृथक् विषयांना वाहिलेले आहेत. इतर अध्यायांत ज्ञानकांड आहे.

तिसऱ्या अध्यायापासून कर्मकांडाला सुरुवात होते. परंतु कर्म कसे करावे याचा निर्णय तिसऱ्यात असला तरी 'ब्रह्मार्पण-क्रिया' चवथ्यात विषद केली आहे.

> जें देहवाचामानसें । विहित निफजे जैसें
> तें एकाचि ईश्वरोद्देशें । कीजे म्हणितलें ।। १८. १४३२
> हेंचि ईश्वरें कर्मयोगें । भजनकथाचेनि खागें ।
> आदरिलें शेषभागें । चतुर्थीचेनि ।।१८. १४३३ ।।

ज्ञानेश्वरीच्या दहाव्या अध्यायात, पहिल्या नऊ अध्यायात काय काय सांगितले आहे, याचा गोषवारा दिलेला आहे. चवथ्या अध्यायाविषयी ज्ञानेश्वर म्हणतात—

> तीजां केवल कर्म प्रतिष्ठिलें । तें चि चौथा ज्ञानेंसीं प्रकटिलें ।। २४ ।।

यावरून चवथ्या अध्यायात ज्ञानयुक्त कर्माचा ऊहापोह आहे. तिसऱ्या व चवथ्या अध्यायांचा विषय 'कर्मयोग' हाच असल्यामुळे चवथ्यामध्ये अनेक ठिकाणी पुनरावृती आढळते. किंबहुना तिसऱ्या अध्यायातील काही महत्त्वाच्या मुद्यांचे विस्तृत स्पष्टीकरणच म्हणजे चवथा अध्याय होय.

## पुनरपि तो अनंतु । आद्य एकि मातु । सांघेल

भगवान् श्रीकृष्ण एक पुरातन कथा अर्जुनाला सांगणार आहेत. अर्थात् ती कथा म्हणजे कर्मयोगाचीच होय. हाच योग पूर्वी भगवंतांनी विवस्वानाला, नंतर विवस्वताने मनूला व मनूने इक्ष्वाकूला सांगितला. अशा तऱ्हेने हा परंपरागत योग जनकादिक राजर्षींनीही आचरिला. पण पुढे हा योग, लोकांचे लक्ष विषयाकडे वळल्यामुळे, नष्ट झाला. तोच योग श्रीकृष्ण अर्जुनाला रणधुमाळीत देखील सांगणार आहे. कारण अर्जुन हा भगवंताचा परमभक्त. भक्ताचे अज्ञान हरण करणे हेच तर ईश्वराचे काम !

## सूर्याला उपदेश

श्रीकृष्णाने हाच योग पूर्वी सूर्याला सांगितला होता हे अर्जुनाला पटले

नाही. कारण श्रीकृष्ण हा सध्याचा, आणि सूर्य तर कितीअगोदरचा ! ही शंका विचारली असता त्यावर श्रीकृष्ण आपले अवतार कार्य अर्जुनास सांगतो.

**अवतारकार्य**

पूर्वी जेव्हा विवस्वान् होता, तेव्हा 'तू मी नव्हतो' ही तुझी झालेली समजूत चुकीची आहे. तुझे माझे पुष्कळ जन्म झाले आहेत, पण त्यांचे तुला स्मरण नाही; मला मात्र आहे. मी अज असून देखील प्रकृतीच्या साहाय्याने पुनः पुनः अवतार घेत असतो. अर्जुना, मी धर्माचे सतत रक्षण करावे हा पूर्वीपासून चालत आलेला क्रमच आहे. म्हणून जेव्हा जेव्हा अधर्म धर्मावर कुरघोडी करतो तेव्हा 'मी अज आहे,' हा विचार मागे ठेवतो व धर्माची उन्नती करण्यासाठी 'अवतार' घेतो. अधर्म बोकाळला म्हणजे सर्व सुख नाहीसे होते. नीतीला स्थान राहत नाही, दुष्टांचे प्राबल्य वाढून सुष्टांचा छळ होतो. म्हणून मी अवतार घेऊन ह्या सर्व वाईट गोष्टींचा नाश करतो व जिकडेतिकडे आनंद पसरवतो.

**ते मद्भावा साहाजें आले**

अशा प्रकारे या दुष्ट प्रवृत्तींचे प्राबल्य पुनःपुनः वाढत असते व मी पुनःपुनः त्यासाठी अवतार घेत असतो. पण अविवेकी लोक या 'अवताराला'च माझा 'जन्म' समजतात. पण मीही सामान्यांप्रमाणेच आहे (जन्म, जरा, मृत्यू ही त्रिपुटी मला लागू आहे) असे समजतात. वास्तविक, मी अज (न जन्मणारा) आहे, हे जे ओळखतात तेच खरे विवेकी असून त्यांची स्थिती 'मी तेचि होऊन ठेले' अशी होते. त्यांच्यात व माझ्यात 'पदर' उरत नाही.

मी गुणकर्मांच्या निकषावरून चातुर्वर्ण्य निर्माण केले आहे. हा वर्णभेद प्रत्येकाच्या प्रकृतीला अनुसरून केला आहे. नैसर्गिक स्वभावावर हे चातुर्वर्ण्य अधिष्ठित असल्यामुळे त्याचा कर्ता मी होऊ शकत नाही. मी केलेली कर्मे मला बंधनकारक ठरत नाहीत. मला कर्मफलाची मुळी इच्छाच नसते. म्हणूनही मला चातुर्वर्ण्याचा कर्ता न समजणेच योग्य. मी निर्गुण, निराकार, अव्यय आहे असे जो जाणतो, तो स्वतःही कर्माकडून बांधला जात नाही

**येथ प्रतिस्फले ते भावना । आपुलाली**

मनुष्य हा स्वभावतःच भजनशील आहे. पण प्रत्येकाची भक्ती, रीती कोटी निरनिराळी असते. जशा व जेवढ्या भावाने ते मला पूजतात, तशा व तेवढ्या प्रमाणात मी त्यांना पावतो. लोक निरनिराळी दैवते निर्माण करतात व त्यांची पूजा करतात. वास्तविक देव असा एकच आहे आणि तो म्हणजे मी. पण बुद्धिभेदामुळे हे लोक अनेकत्व कल्पितात व निरनिराळ्या हेतूंनी प्रेरित होऊन उपासना करतात. निरनिराळ्या देवतांच्या समोर चाललेल्या उपासनेला मी हजर असतो व त्यांच्या त्यांच्या भावांनुसार फळ देतो. भाव तैसा देव.

**हे कर्माकर्मविवंचना**

विहित कर्म ते कोणते आणि निषिद्ध (अ) कर्म म्हणजे काय याचा खुलासा करताना विद्वान् देखील मोहात सापडतात ! (आणि हे अक्षरशः खरे आहे. कारण कर्म, अकर्म, विकर्म ह्या संज्ञांच्या अर्थामध्येदेखील विद्वानात तीव्र मतभेद आहे. ज्ञानेश्वर ज्याला विशेष कर्म म्हणतात त्यालाच वामनपंडित विरुद्ध कर्म समजतात ! असे नेमके विरुद्ध अर्थ आहेत. ज्ञानेश्वरांना निषिद्ध कर्म म्हणजे अकर्म हे अभिप्रेत आहे तर लोकमान्यांचा अकर्म म्हणजे सात्त्विककर्म असा अर्थ आहे ! ) म्हणून भगवान् श्रीकृष्ण म्हणतात की अर्जुना, तू ज्यायोगे मुक्त होशील असे कर्म तुला सांगतो. कर्माचे स्वरूप अनाकलनीय असल्यामुळे कर्म, विकर्म आणि अकर्म नीट समजावून घेतली पाहिजेत. म्हणून

१ **कर्म**—तरि हें कर्म म्हणिजे स्वभावें । जेणें विश्वकारु संभवे ।

२ **विकर्म**—वर्णाश्रमासि उचित । जें विशेष कर्म विहित ।

३ **अकर्म**—पाठिं (शास्त्रात) जें निषिद्ध म्हणिलें ।

अशा तऱ्हेचा कर्मविकर्माकर्म विचार जाणून आचरण करावे.

**जो सकलकर्मी वर्त्ततां । देखे निष्कर्मता**

कर्म करून निष्कर्मी होणारा हाच खरा बुद्धिमान. "कर्म करून निष्कर्म होणे" हा प्रारंभी 'वदतोव्याघात' भासतो ( व ज्ञानेश्वरांनीही 'नेणसी तूं

हें कवतिक ' असेच तिसऱ्यात म्हटले आहे.) पण हा ' विरोधाभास ' आहे. निष्कर्म असा मनुष्यच जगात सापडू शकत नाही. कर्माचा त्याग हा संभवतच नाही. व हा अर्थ ज्ञानेश्वरांना अभिप्रेतही नाही. तर कर्माचे बंधकत्व नष्ट होईल अशा रीतीने कर्म करणे यालाच नैष्कर्म्य म्हणतात. कर्माचे बंधन हे कर्त्याच्या अहंभावातच असते. केलेल्या कर्माचे फळ मला मिळाले पाहिजे किंवा हे कर्म मी केले आहे अशी ज्यांची भावना असते त्यांनाच कर्म बंधनकारक ठरते. एरव्ही

जेयां पुरुषाचा ठाईं । कर्माचा तरि खेदु नाही
परि फळापेक्षा कांहीं । संचरेना ।। १०२ ||
आणि हें कर्म मी करीन । अथवा आदरिलें सिद्धी नेईन
येणें संकल्पेंहि जयाचें मन । विटाले ना ।। १०३ ।।

असा मनुष्य निष्कर्मच होतो व मनुष्यरूपाने साक्षात् ब्रह्मच असतो. तो अहंभावासह आशेची उपाधी टाळतो अर्थात् त्यामुळे अशा मनुष्याने मग कोणतेही कर्म केले तरी ते त्याला बाधक ठरत नाही.

**ऐसें बहुतीं परी अनेक । जे सांधितले का याग ।**

यज्ञासाठी केलेले कर्म हे नष्ट होते कारण यज्ञात हे हवन, हा होता आणि हा भोक्ता ही त्रिपुटी लय पावते. यज्ञातील सर्व सामग्री तो आत्म-स्वरूपच समजतो. कर्म हेच ब्रह्म आहे असे त्याला समजल्यामुळे साहजिक त्याचे कर्म निष्कर्म ठरते. यज्ञ करण्याचे निरनिराळे प्रकार आहेत. कित्येक मनासह अविद्येची आहुती गुरुपदेशरूपी मंत्राग्नीत टाकून ' दैवयज्ञ ' करतात. तर काही ब्रह्माग्नीचे होत्र करून यज्ञानेच यज्ञ करतात. कोणी आत्मसंयमनरूपी अग्निहोत्रात कायावाचामनें, नियमन हेच कोणी मंत्र ते उच्चारून इंद्रियरूपी द्रव्याची आहुती टाकतात. कित्येक वैराग्याग्नीत विकारांची समिधा टाकून " अहं ब्रह्मास्मि " हा मंत्र म्हणतात. इतर काही विवेकाने ज्ञानाग्नि निर्माण करून यज्ञ करतात व " सोऽहमस्मि " मंत्राने आहुती टाकतात. कोणी शब्दांच्या साहाय्याने शब्दांचा शब्दांत होम करतात. त्यास ' वाग्यज्ञ ' म्हणतात. ज्ञानाने ब्रह्माची प्राप्ती करून घेणे, यास ' ज्ञानयज्ञ ' म्हणावा. कित्येक योगी प्राणायामरूपी यज्ञ

करतात, तर काही प्राणांच्या ठिकाणीं प्राणांचें हवन करून 'वज्रयोगयज्ञ' करतात.

अशा तऱ्हेचे निरनिराळे यज्ञप्रकार आहेत. पण ज्याप्रमाणे तारांगणाचे तेज हे सूर्याच्या तेजापुढे फिके पडते तद्वत्, हे अर्जुना, इतर यज्ञ

ज्ञानयज्ञाची सरी न पवति ।

हे लक्षात ठेव. ह्या यज्ञामुळे नैष्कर्माची खाणच सापडून कर्माची आवड नाहीशी होते. एवढेच काय पण मनाचे मनपणही नष्ट होते !

**तैं संता येयां भजावें ।**

अर्थात् असा ज्ञानयज्ञ साधण्यासाठी साधकाचा अधिकार फार मोठा पाहिजे. पण असा अधिकार सर्वांना प्राप्त होणे शक्य नाही. तरी यावर एक 'रामबाण' उपाय आहे. तो उपाय म्हणजे संतांची जिवाभावाने सेवा करणे. अभिमान टाकून देऊन संतांच्या चरणी लागावे. आपणास असल्यानसल्या शंका विचारून संत सांगतील त्या मार्गाने जावे. म्हणजे मनुष्य कितीही सामान्य असला, किंबहुना "कल्मषाचा आगरु । भ्रांतीचा सागरु : व्यामोहाचा डोंगरु" असला तरी तोउद्धरून जाईल हे नक्कीच. अशा तऱ्हेचा सद्‌गुरूचा प्रसाद लाभल्यानंतर अर्जुना, तू स्वतःसह सर्व भूतमात्रे माझ्याच स्वरूपात पाहशील, इतकी तुझी एकाग्रता होईल.

**हे ज्ञानिची पवित्रता । ज्ञानीचि आथि ।**

अशा तऱ्हेचे ज्ञान की ज्यायोगे मनोमल नाहीसे होऊन जातात व मनुष्य परब्रह्मस्वरूपी लीन होतो, हे सर्वात पवित्र आहे. त्याला दुसऱ्या कशाचीही उपमा देणे म्हणजे त्याला दूषण देणेच होय. ज्ञानाला उपमा द्यायचीच झाल्यास ज्ञानाचीच द्यावी, हे ज्ञानेश्वर

जैसी अमृताची चवी निवडिजे । तरि अमृताचि सारिखी म्हणिजे ।
तैसे ज्ञान हें उपमिजे । ज्ञानेंसीं चि ॥ ४-८१ ॥

या ओवीत अनन्वय अलंकारद्वारे सांगतात.

**तेंचि ज्ञान केवि जाणावें ?**

असा प्रश्न सहजच उपस्थित होतो. आत्मसुखाची गोडी चाखण्याची

आत्यंतिक इच्छा असल्यामुळे जो मनुष्य विषयांचा धिक्कार करतो, व ज्याची श्रद्धा अखंड असते, अशाला ज्ञानच स्वतः हुडकीत येते ! अशा तऱ्हेने तो ज्ञानयुक्त झाला म्हणजे त्याची आपपरभावना नष्ट होऊन तो सर्वत्र शांतताच पाहतो. उलट, ज्या मनुष्याला ज्ञानाविषयी बिलकूल श्रद्धा नाही असा मनुष्य जिवंत असून मेल्यासारखाच आहे. तो मनुष्य संशयाच्या जाळ्यात सापडून विषयसुखातच धन्यता मानतो. त्याला पारलौकिक सुख तर मिळत नाहीच पण ऐहिक सुखही मिळत नाही. म्हणून संशय टाकून देणे हे आद्य कर्तव्य आहे. संशय नाहीसा करण्याचा एकमेव उपाय म्हणजे ज्ञान. म्हणून पार्था,

उठी वेगीं वरौता । नाशु करूनि हृदयस्था । संशयासि ॥

* *

## ३. ज्ञानेश्वरीच्या चौथ्या अध्यायातील भूमिका : काव्याची की तत्त्वज्ञानाची ?

उपक्रमोपसंहारौ अभ्यासोऽपूर्वता फलम् ।
अर्थवादोपपत्ती च लिङ्गं तात्पर्यनिर्णये ॥

कोणत्याही ग्रंथाचे व अध्यायाचे तात्पर्य काढणे झाल्यास मीमांसकांच्या मताप्रमाणे वरील श्लोकात सांगितलेल्या सात गोष्टी साधनीभूत ( लिंग ) म्हणून त्यांचा विचार केला पाहिजे. या सात गोष्टींचे खुलासेवार स्पष्टीकरण लो. टिळकांनी 'गीतारहस्या'च्या विषय प्रवेशात केले आहे. ( गी. र. पृ. २१ ते २३ पाहावे ) त्याच्या आधारे ज्ञानेश्वरीच्या चौथ्या अध्यायाची छाननी केल्यास याचे तात्पर्य काय हे कळून येईल.

'उपक्रम' आणि 'उपसंहार' म्हणजे प्रारंभ आणि शेवट. आद्यन्त पाहून ग्रंथाचे तात्पर्य काय, याची दिशा प्रथम निश्चित करावी. नतर त्यांत 'अभ्यास' म्हणजे पुनरुक्ती किंवा वारंवार काय सांगितले आहे ते पाहिले पाहिजे. कारण ग्रंथकाराचे उद्दिष्ट असते ते सफल झाले हे दाखविण्यासाठी तो पुन पुन अमुक गोष्ट केली पाहिजे, अमुक गोष्ट सिद्ध झाली, असे सांगत असतो. 'अपूर्वता' म्हणजे नवेपणा, वेगळेपणा किंवा

वैशिष्ट्य. 'फल' म्हणजे परिणाम. अर्थात् ग्रंथामध्ये असलेले नावीन्य कोणते ते पाहावे व त्या ग्रंथाचा परिणाम काय होतो याकडेही लक्ष पुरवावे. कारण घडलेल्या परिणामावरून लेखकाचा आशय आणि उद्दिष्ट आपोआपच कळून येतात. 'अर्थवाद' हा मीमांसकांचा पारिभाषिक शब्द आहे. आपणास मुख्यतः कोणत्या गोष्टीचे विधान करावयाचे आहे हे ठरलेले असतांही प्रतिपादनाच्या ओघांत दाखल्यासाठी, तुलना करून एकवाक्यता करण्यास अगर साम्य व भेद दाखविण्यास अलंकारार्थ, स्पष्टीकरणार्थ किंवा भरतीसाठी जी नुसती प्रशंसापर म्हणजे पोकळ, आगंतुक अगर स्तुत्यर्थ विधाने केली जातात त्यांना 'अर्थवाद' असे नाव आहे. इंग्रजीतील obiter dicta ( बाह्यात् विधाने ) हा अर्थवादाचाच एक प्रकार आहे. ( गी. र. पृ. २३ ) 'उपपत्ति' म्हणजे साधक प्रमाणांची तर्कशास्त्रानुसार शिस्तवार मांडणी अर्थात् कारणमीमांसा. उपक्रमोपसंहाररूप दोन टोके प्रथम कायम झाल्यावर मधली वाट अर्थवादोपपत्तीच्या आखणीने निश्चित करून ग्रंथातील पुनरुक्ती, वैशिष्ट्य आणि त्याचा परिणाम पाहून ग्रंथाचा तात्पर्यनिर्णय करावा असा मीमांसकांचा अभिप्राय आहे ( गी. र. पृ. २३ ) या दृष्टीने ज्ञानेश्वरीच्या चौथ्या अध्यायाचा विचार केला असता त्याच्या उपक्रमात,

'आजि श्रवणेंद्रिया पीकलें । जेणें हे गीतानिधान देखिलें' असे प्रारंभीच सांगून श्रवणेंद्रियाला सुकाळ करणाऱ्या गीताविषयाचे महत्त्व वर्णन केले आहे. चौथ्या अध्यायाचा विषय 'विवेकाची गोठी' हा असला तरी त्यात ज्ञानेश्वरांच्या मते श्रवणोपभोगाचे गीतारण्य 'संवादसुख' आहे हा मुद्दा स्पष्ट झाला आहे. हा अतिशयो अतिप्रसंगें । सांडूनि कथाचि ते सांगें (६) या धृतराष्ट्राच्या सूचक उद्गारावरून संवादसुखाचा गौरव हा अतिशय व अतिप्रसंग अर्थात् अर्थवादात्मक होय म्हणून । सोडून देऊन संजयाने यन्हार्ति य गिया नाडऱे । वेदार्थासि नाकळे । जेथ ध्यानाचे डोळे । पान्गति ना (१२) तो अर्जुनाच्या प्रेमामुळे कसा 'सकृप' व मूर्तस्वरूप झाला याचे प्रारंभीच्या चौदा ओव्यांत वर्णन केले आहे.

या उपक्रमाच्या एका टोकाशी चौथ्या अध्यायाच्या उपसंहाराचे दुसरे टोक सांधले असता चौथ्या अध्यायातील ग्रंथकाराला उद्दिष्ट असलेले

तात्पर्य स्पष्ट होतें. उपक्रमात ‘श्रवणेंद्रियाच्या संवादसुखाचा’ व श्रीकृष्णाच्या ‘सकृप’ होण्याचा जो उल्लेख आहे तसाच उपसंहारातही

ऐसें सर्वज्ञाचा बापु । जो कृष्णु ज्ञानदीपु
तो म्हणतसे सकृपु । आइकें राया ॥ २०८ ॥

या ठिकाणी ‘सकृप’ हाच शब्द असून कथेच्या संवादसुखाऐवजी

तैसें कथेचें इये आइकणें । श्रवणासि होये पारणें ॥ २१९॥

असा श्रवणाचे पारणे फिटल्याचा उल्लेख असून ‘एथ मोक्ष असे आइकतां । श्रवणा माझि’ (२२१) अशी मोक्षाची अपेक्षा व्यक्त केली आहे.

म्हणौनि आथिलिया आराणुका । गीतार्थु हा नीका
ज्ञानदेओ म्हणे आइकां । निवृत्तिदासु ॥ २२२ ॥

अर्थात् उपक्रम आणि उपसंहार यांतून ज्ञानेश्वरांचे उद्दिष्ट गीतार्थ सांगण्याच्या निमित्ताने कृष्णार्जुनाचा संवाद कथन करून श्रोत्यांच्या श्रवणेंद्रियांना मोक्षसुख मिळेल अशा रीतीने त्यांना ‘आराणुका’ प्राप्त करून देणे, हे उघड दिसते.

चवथ्या अध्यायात ‘अभ्यास’ किंवा पुनरुक्ती ही कृष्णार्जुन-प्रेमाचीच झालेली आहे.

तूं प्रेमाचा पूतला । भक्तिचा जीवाला ॥ २८ ॥
तूं संवसारश्रांताची साउली । अनाथांची माउली ॥ ३२ ॥
स्वसुखें विश्व कोंदे । धर्माचें जगीं नांदे
भक्तांसि होंति दोंदें । सात्विकाचीं ॥ ५४ ॥
कैसा अधिकाधिक आवडी । घेत महासुखाची गोडी ॥ १०७ ॥
मग आत्मबोधिचें सुख । तें जैसें संयामाग्नीचें शेष ॥ १३७ ॥

ही भक्तिसुखाच्या उत्कट वर्णनाची पुनरुक्ती ज्ञानेश्वरांची गीतार्थप्रथनाच्या मिषाने शांतरसाचा वर्षाव करणारी भूमिका विशद करणारीच नाही काय ?

ज्ञानेश्वरी हे मूळ गीतेवर चढविलेले ‘देशीकार लेणे’ असल्यामुळे तीतील ‘अभ्यास’ हा गीतार्थ देणाऱ्या रूपांतरात्मक ओंव्या वगळूनच शोधला पाहिजे. तसेंच तिच्यातील ‘अपूर्वता’ पाहावयाची म्हणजे इतर गीताटीकांच्या मानाने तीत नवेपणा कोणता आहे याचाच विचार करणें

योग्य होईल. ज्ञानेश्वरी ही नंतरच्या संतकाव्याला व भक्तिकाव्याला अनेक बाबतीत उपजीव्य ठरली. पण तिच्या ज्या वैशिष्ट्याचे पुढिलांनी प्रामुख्याने अनुकरण केले ते म्हणजे तीतील मानवी जिव्हाळा व्यक्त करणारे प्रेम-संवाद होत.

अगदी प्रारंभी श्रवणमहात्म्य वर्णन करण्याच्या ओघात संजय वाहवत आहे असे पाहून ज्ञानेश्वरांचे धृतराष्ट्र कंटाळतात व विषयान्तर न करता मुख्य मुद्याकडे वळण्यासाठी सुचवितात (६). ज्ञान हें उपमिजे । ज्ञानेंसी चि ।। १८१ ।। असे म्हणून आता याहून अधिक काय सांगावे व व्यर्थ वेळ का घालावा असे बोलून जातो. पण त्यावर ज्ञानेश्वरांचा अर्जुन " साच जी । बोलिजत असां ।। ८२ ।। परि तेंचि ज्ञान केवि जाणावें " असा प्रश्न मनात आणतो न आणतो तोच " तवं तें मनोगत देवें । जाणीतलें ।। ८३ ।। " असे म्हणून कृष्णार्जुनांच्या शब्दसंवादाबरोबर त्यांचा हृदय-संवादही झाला आहे असे ज्ञानेश्वर दर्शवितात.

चौथ्या अध्यायाचे 'फल' कोणते ? सर्वच संतवाङ्मयाचे अंतिम फल मोक्ष असले तरी ज्ञानेश्वरीचे व विशेषतः ज्ञानयोग-प्रतिपादक अशा चौथ्या अध्यायाचे 'संसारदुःखा मोकलविणें' आणि 'मोक्ष' हे काही तात्कालिक फल किंवा प्रयोजन होऊ शकत नाही. ईश्वरयशोगान, संतप्रेमसंपादन व रसिकश्रोत्यांच्या आनंदासाठी केलेला साक्षेप हेच ज्ञानेश्वरीचे प्रयोजन समजले पाहिजे. (पाहा : 'मराठीचे साहित्यशास्त्र—ज्ञानेश्वर ते रामदास' पृ. ९४ ते १००.)

> जें साहित्य आणि शांती । हे रेखा दिसे बोलती
> जैसी लावण्यगुणयुवती । आणि पतिव्रता ।। २१५ ।।

या चौथ्या अध्यायातील उद्गारावरून ज्ञानेश्वरीच्या बोलक्या रेखेत काव्याची गुणालंकाररीती इत्यादी प्रसाधनसामग्री अर्थात् साहित्य आणि ज्यामुळे इतर आठही रसांना ओलावा मिळून त्यांना 'रसत्व' येते तो शांत रस याचे प्रतिपादन हेच ज्ञानेश्वरांचे प्रमुख उद्दिष्ट होय, हे उघड दिसते. युवतीच्या लावण्यादी गुणांप्रमाणे काव्यातील साहित्य ही बाह्यशोभा परंतु तिच्या सर्वश्रेष्ठ असलेल्या पातिव्रत्य या आन्तरिक व आत्मिक गुणा-

प्रमाणे सर्व रसांना शेखरीभूत असलेला शांतरस हा मात्र काव्याचा आत्मा होय.

आदिंचि साखर आवडे । आणि तेचि जरि ओखदा जोडे
तरि न सेवावी कां कोडें । नावां नावां ।। २१६ ।।

या लगेचच्या ओवीत साखरेच्या गोडीची तुलना साहित्याशी आणि तिच्या अंगच्या औषधित्वाची शांतरसाशी केली असून, रोगू जाये दूधें ओंगरें । तरि नींबु कां पियावा ? असा प्रश्न केला आहे. साहित्यदर्पणकार विश्वनाथानेही 'कटुकौषधोपशमनीयस्य रोगस्य सितशर्करोपशमनीयत्वे कस्य वा रोगिणः सितशर्कराप्रवृत्तिः साधीयसी न स्यात् ?' (सा. द. १. २ वरील भाष्य. पाहा : 'ज्ञानेश्वरींतील विदग्ध रसवृत्ति' पृ. १३४) असा ज्ञानेश्वरांच्याच धर्तीचा प्रश्न विचारून तेच उत्तर सुचविले आहे. अर्थात् उभयतांच्या विचारांचे 'फल' एकच आहे.

ज्ञानेश्वरांच्या अर्थवादांची उदाहरणे किती म्हणून सांगावी ? जाणून बुजून उपमाश्लेषकोंदाकोंदी केलेली आणि साहित्याचा बरवा सांगून साहित्यावरही लेणें चढविणारी त्यांची ओवीरचना ! तेथे प्रशंसेला आणि गौरवाला काय वाण ? शिवाय चौथ्या अध्यायात आधी ज्ञानयोगाचेच मुळी वर्णन, साक्षात् ज्ञानेश्वर हे वर्णन करणारे; शिवाय,

आदी चि विवेकाची गोठी । वरि प्रतिपदी कृष्णु जगजेठी
आणि भक्तराजु किरीटी । परिसत असे ।। २ ।।

असा 'भला जाला विनोदु कथेच्या इयें' यात नवल नाही.

ऐसें सेखामृतें धाले । कीं अमृतभावासि आले
म्हणौनि ब्रह्म ते जाले । अनायासें ।। १५१ ।।
जेयाचां बरवेपणीं । कीजे आठां रसांची ओलावणी ।। २१० ।।

अशा प्रकारच्या सर्व आलंकारिक ओव्यांतील अलंकारार्थ हा 'अर्थवाद' कसा आहे हें विशद करून सांगण्याची गरज नाही. ही अर्थवादात्मक उदाहरणे सोडून ज्ञानेश्वरांच्या भूमिकेचा विचार करावयाचा म्हणजे तात्पर्यनिर्णयाला साधनीभूत (लिंग) असलेली सातवी गोष्ट अर्थात् 'उपपत्ति' पाहिली पाहिजे.

'ज्ञानयोग' अथवा 'ब्रह्मार्पणयोग' हा विषय असलेल्या गीतेच्या चवथ्या अध्यायावरील ज्ञानेश्वरी टीकेचे उपक्रम, उपसंहार, अभ्यास, अपूर्वता व फल हे लक्षात घेऊन व अर्थवादात्मक उद्गार वगळून 'उपपत्ति' पाहणे सोपे आहे. कारण श्रवणेंद्रियांचा सुकाळ करण्यास उद्युक्त झालेल्या ग्रंथकाराला शांतरसाच्या अभिव्यक्तीने मनाच्या आराणुका सफल करण्यासाठी साधक अशी प्रमाणे काव्यनिर्मितीच्या कारणमीमांसेखेरीज इतर कोणती असणार ?

श्रोत्यांच्या समाधानासाठी आणि त्यांच्या श्रवणसुखाचे पारणे फेडण्यासाठी ज्ञानेश्वरांनी विश्वामित्राच्या प्रतिसृष्टीलाही फजीत करणारी काव्यसृष्टी कशी निर्माण केली, त्यांची प्रतिमासृष्टी कशी वैशिष्ट्यपूर्ण व बहुतांशी स्वतंत्र आहे, विविध अलंकारांच्या सजावटीने त्यांनी आपली शांतरस-परिपूर्ण निर्मिती कशी घडविली आहे याची प्रमाणे सर्व अध्यायभर विखुरली आहेत. या अध्यायाची 'उपपत्ति' ती हीच.

सारांश, विवेकाची गोठी किंवा ब्रह्मार्पणबुद्धीने कर्म कसे करावे हे सांगणारा ज्ञानकर्मयोग हा चवथ्या अध्यायाचा प्रतिपाद्य विषय असून तो ज्ञानेश्वरांनी शान्तरस-परिपूर्ण अशा काव्यात्मकतेने वर्णन केला आहे. श्रेष्ठ प्रतीच्या काव्यात कोणता ना कोणता तरी रस हा असणारच. ज्ञानेश्वरीत आणि विशेषतः तिच्या चौथ्या अध्यायात आत्मज्ञान हाच विषय असल्याकारणाने व अभिनवगुप्ताचार्यांनी आत्मज्ञान किंवा आत्मा हाच शांतरसाचा आत्मा म्हणून प्रतिपादन केले असल्यामुळे ज्ञानेश्वरी काव्याचा रस शांत हे ओघानेच येते. खुद्द ज्ञानेश्वरांनीही श्रेष्ठ प्रतीच्या काव्याचा आदर्श असाच सांगितला आहे—

> वाचे बरवें कवित्व । कवित्वीं बरवें रसिकत्व
> रसिकत्वींहि परतत्त्व । स्पर्श जैसा ।। १८·३४५ ।।

—वाणीच्या ठिकाणी कवित्व असले तर ते श्रेयस्कर होय; कवित्वातही रसवत्ता असेल तर ते कवित्व अधिक चांगले आणि त्या रसिकतेमध्येही परतत्त्वाचा स्पर्श असेल तर ते उत्कृष्टच होय. या दृष्टान्तातून परमेश्वरी तत्त्वाचे प्रतिपादन म्हणजे रसाळपणाचा गाभा होय व हेच श्रेष्ठ काव्याचे परमोद्दिष्ट होय, हे ज्ञानेश्वरांचे मत निष्पन्न होते.

माझी प्रज्ञावेलिवें वेल्हाल । काव्यें होंति सुफल
तो वसंतु होई स्नेहाल । शिरोमणी ।। १४.२१ ।।

या ओवीत "माझ्या प्रज्ञारूपी. वेलीला काव्यरूपी मनोवेधक सुंदर फळे यावी यासाठी हे प्रेममूर्ती गुरो, तू वसंतऋतू हो !" असे म्हणून ज्ञानेश्वरांनी आपल्या प्रज्ञेकडून रसाळ काव्यें निर्माण व्हावी अशीच गुरूंची करुणा भाकली आहे.

चवथ्या आणि इतर सर्व अध्यायांत ज्ञानेश्वरांची भूमिका खुद्द त्यांनीच परतत्त्वस्पर्श घडविणाऱ्या शांतरसनिर्मात्या कवीची आहे हे वारंवार स्पष्ट केले असताना ती तत्त्वज्ञान्याची आहे असा प्रश्न तरी का उत्पन्न व्हावा ? पण तो उत्पन्न झाला आहे व ज्ञानेश्वरी हा एक तत्त्वज्ञानाचा थोर ग्रंथ असून त्यात काव्य हें आपाततः आले आहे, असेही एक मत मातबर विद्वानांत प्रचलित आहे.

ज्ञानेश्वरी हा तत्त्वज्ञानाचा ग्रंथ म्हटल्याबरोबर त्यातील 'तत्त्वज्ञान' पारिभाषिक अर्थाने कोणते ? असा वाद निर्माण होणे व त्याचीही चर्चा होणे हे क्रमप्राप्त आहे; अनेक विद्वानांनी ती केली आहे. अशा विद्वानांत आजवर एकवाक्यता झालेली दिसत नाही. किंबहुना विद्वज्जनांच्या या मतामतांच्या गलबल्यातून 'अमृतानुभव' ग्रंथाप्रमाणे ज्ञानेश्वरीत ज्ञानेश्वरांचे असे स्वतंत्र तत्त्वज्ञान नाही, गीतार्थ सांगण्याच्या निमित्ताने त्यांनी मूळ गीतेच्या प्रतिपाद्य विषयाला धरून एक रससिद्ध काव्य निर्माण केले आहे, असाच निष्कर्ष निघू पाहतो.

ज्ञानेश्वरीला 'काव्य' म्हणताना ज्ञानेश्वरीचे मर्मज्ञ विचकतात याचे कारण त्यांच्या काव्यविषयक कल्पना पारंपरिक संस्कृत साहित्यशास्त्रातून उचललेल्या असतात व काव्य म्हणताच रसराज म्हणून संस्कृत साहित्यशास्त्रात गौरविलेल्या शृंगाररसाने नटलेली प्रसिद्ध काव्येच त्यांच्या डोळ्यासमोर उभी राहतात. स्थूलदृष्टीला हे स्वाभाविक असले तरी सूक्ष्म दृष्टीच्या सहृदय रसिकांना ज्ञानेश्वरीचा काही निराळाच आस्वाद येत नाही काय ? शिवाय, खुद्द ज्ञानेश्वरांनीच

देशीयेचेनि नागरपणें । शांतु शृंगारातें जीणे ।। १०.४१ ।।

नसुदीचि शांती कथा । आणिजैल किर वाक्यपथा
परि शृंगाराच्यां माथां । पावो ठेविति ।। १३.११५० ।।

अशी शृंगाराच्या माथ्यावर शांतरसाकडून पादाघात करविण्याची प्रतिज्ञापूर्वक केलेली गर्जना कशी बरे विसरता येईल ?

ज्ञानेश्वरांच्या अलौकिक काव्याकडे पाहताना आपल्या किंवा पारंपरिक काव्यदृष्टीने पाहणे उचित नाही. 'या बड्या बंडवाल्यांत । ज्ञानेश्वर मानें पहिला' म्हणून 'बी' या आधुनिक कविश्रेष्ठाने ज्यांच्या नांवाने 'डंका' वाजविला त्या ज्ञानेश्वरांनीच त्यांच्या विश्वमोहक काव्याकडे पाहण्याची अलौकिक अशी दिव्य दृष्टीही दिली नाही काय ? 'बी' कवीच्याच शब्दात ज्ञानेश्वरीबद्दलही असेच म्हणता येईल :

अथांग अव्यक्तांतुन होशीं निजलीला व्यक्त
तुझें तूंच निर्मिशी प्रसाधनशासन अभियुक्त ।।

या विद्वानांचे दुसरे असेही एक मत आहे की, ज्ञानेश्वरीचे तत्त्वज्ञान हे साध्य आणि काव्य हे साधन आहे; अर्थात् साधनाला साध्याची जागा देणे योग्य नव्हे. हा आक्षेप साध्य व साधन यांना परस्पर पृथक् मानण्याच्या दृष्टिक्षेपामुळे उत्पन्न झालेला आहे. साधनांची साध्याइतकीच शुचिता मानणारे ज्ञानेश्वर असल्यामुळे काव्यातला शांतरस आणि परतत्त्वस्पर्श यात ते काहीच अंतर मानीत नाहीत.

तैसें अध्यात्मशास्त्रीं इये । एक अंतरंगचि अधिकारिये ।
येरि लोक वाक्चातुर्यें । होईल सुखिया ।

चकोरपक्षी आपल्या सामर्थ्याने चंद्रकिरणांतील अमृत पिऊन घेईल पण चांदण्याचा उपभोग मात्र कोणालाही घेता येईल. तद्वत् तेथील अध्यात्म शास्त्राचा परामर्श हा केवळ अधिकारी अशा जितेंद्रिय व्यक्तींनाच घेता येईल, पण त्यातील वाङ्मयचातुर्याचा किंवा काव्यानंदाचा उपभोग मात्र सर्व लोकांनाच मिळू शकेल. या ओवीच्या आधारे ज्ञानेश्वरी हा खरोखरी अध्यात्मशास्त्राचाच ग्रंथ आहे, त्याच्या अंतरंगाचे खरे अधिकारी अध्यात्म-शास्त्रज्ञच होत; पण इतरेजन अर्थात् अनधिकारी मात्र केवळ बाह्यांगावर व शाब्दिक कुसरीवरच खूष होतात असे प्रतिपादन केले जाते. वास्तविक

पाहता या ओवीचा रोख ज्ञानेश्वरी ग्रंथाचा विषय अध्यात्म असला तरी त्याचा आविर्भाव काव्यात्मक असल्यामुळे त्याचा आस्वाद केवळ अध्यात्माच्या अधिकाऱ्यांनाच नव्हे तर सर्वसामान्य सहृदयांनाही सहज घेता येईल असा, शांतरसामुळे या ‘ मराठीचिये नगरीं ’ ब्रह्मविद्येचा सुकाळ झाला आहे असे सांगण्याचा आहे.

यासारख्याच काही उद्गारांच्या आधारे ज्ञानेश्वरीत अध्यात्म आणि काव्य यांचा समन्वय झाला आहे असेही काहींचे प्रतिपादन असते. ‘ ज्ञानेश्वरी हे तत्त्वज्ञान व काव्य या दोन भिन्न रंगांच्या आडव्या उभ्या धाग्यांनी विणलेले व दोन भिन्न रंगांची मधूनमधून झाक दाखविणारे भरजरी वस्त्र आहे ! ’ ( पाहा : तत्त्वज्ञ–कवि श्रीज्ञानेश्वर – ग. श्री. हुपरीकर ‘ ज्ञानेश्वरदर्शन ’ पृ. २१५ ते ३०६ ) या अभिप्रायात काव्य आणि त्याचा विषय यांच्या परस्परसंबंधाविषयी काहीसा अपसमज आहे असे म्हणावे लागते. कारण काव्य म्हणजे काव्याचा विषय नव्हे, तसेच काव्याचा त्याच्या विषयाशी समन्वय घडतो अशी बाब नाही. इंग्रजी टीकाकार ए. ई. हाऊसमन् याने म्हटल्याप्रमाणे “ Poetry is not the thing said but the way of saying it ” काव्य म्हणजे प्रतिपाद्य विषय नव्हे तर तो विषय वर्णन करण्याची पद्धती आहे. काव्यातील शब्द व त्या शब्दांमधून जो अर्थ किंवा विषय सांगितला जातो त्याचे संपृक्तत्व म्हणजे काव्य होय. असे संपृक्तत्व वा सहितत्व नसेल तेथे साहित्य किंवा काव्यत्व कसे संभवेल ? शिवाय ज्ञानेश्वरी हे अध्यात्मविषयक काव्य आहे असे म्हटल्यावर त्याचा अध्यात्म हा विषय आहे हा मुद्दा अगदी गौण ठरतो. काव्य हे कोणत्या ना कोणत्या विषयावर असणारच ! काव्याची वर्गवारी त्यातील विषया-नुरोधाने करावयाची नसते. कारण कोणत्याही काव्याचा रसास्वाद हा केवलस्वरूपी असतो. शिवाय ऐतिहासिक काव्य म्हणजे इतिहास नव्हे, निसर्ग-विषयक काव्य म्हणजे निसर्ग नव्हे तद्वत् अध्यात्मविषयक काव्य म्हणजे अध्यात्म नव्हे, काव्यत्व होय !

* *

## ४. ज्ञानेश्वरीच्या चौथ्या अध्यायातील मूलानुसरण

### ज्ञानेश्वरांनी केलेल्या संकोचविस्ताराचे तौलनिक विवेचन :

ज्ञानेश्वरांचा 'गीतार्थ' हा शंकराचार्यादिकांच्या गीतेवरील 'भाष्या'-सारखा नसून, खुद्द त्यांच्याच भाषेत सांगावयाचे म्हणजे हे संस्कृत भगवद्गीते-वरील 'देशीकार लेणें' होय. याचे स्वरूप आधुनिक व्याख्यान किंवा प्रवचन यासारखे आहे. मात्र ते नागर पद्यबंधात्मक असून त्यात शांत रसाचे अभिनव रीत्या प्रतिपादन केलेले आहे, हे लक्षात घेणे जरूर आहे. त्यामुळे ज्ञानेश्वरांनी सर्व अध्याय हे एकमेकांशी अत्यंत संलग्न करून आपल्या कृतीला कथेचे स्वरूप दिले आहे. ज्ञानेश्वरांच्या या टीकेचे निरीक्षण केले असता पुढील निष्कर्ष काढता येतात.

(१) **अध्यायाचे उपक्रमोपसंहार**—कित्येक अध्यायांच्या प्रारंभी प्रास्ताविक व शेवटी उपसंहार असून त्यात कधी गुरूचे माहात्म्य तर कधी श्रोत्यांना विनवणी, तर कधी श्रीकृष्ण-अर्जुनाच्या प्रेमळ संवादातील खटका दाखवितात. त्यामुळे पुढे येणाऱ्या प्रसंगाची वाचकांना (श्रोत्यांना) उत्कंठा लागावी हे साहजिकच आहे. चवथ्या अध्यायातील पहिल्या १४ ओव्यात अर्जुनाच्या भाग्याचे वर्णन असून श्रीकृष्णार्जुनसंवाद हा श्रोत्यांच्या सर्वेंद्रि-यांना सुखकारक होईल असा हा ग्रंथ आहे असे आश्वासन दिले आहे. अध्यायाच्या उपसंहारात पुढील अध्यायाचे दिग्दर्शनही असते. ओवी २०८ ते २२२ मध्ये अर्जुनाकडून विचारला जाणारा प्रश्न किती मनोरम आहे याचे सुंदर वर्णन करून पुढील अध्यायाविषयी उत्सुकता निर्माण केली आहे.

(२) **भक्तीचा ओलावा आणण्यासाठी नवीन संवादांची भर**—मधूनमधून संजय-धृतराष्ट्र, वक्ता-श्रोते, श्रीकृष्ण-अर्जुन यांचा कल्पित संवाद घालून विषयाची गोडी आणखीच वाढविली जाते व त्यामुळे कथा जिवंत वाटते. प्रस्तुत अध्यायात तिसऱ्या श्लोकावरील टीकेत श्रीकृष्णाच्या वात्स-ल्याला ज्ञानेश्वरांच्या अर्जुनाने ५ ओव्यांत (३१-३५) उत्तर देऊन ३ व ४ या श्लोकांचा दुवा सांधला आहे. तसेच ३८ व्या श्लोकावरील व्याख्यानात मध्येच अर्जुनाचे "तव साच जी...बोलिजत असा" (१८२) असे

वचन असून त्याच्या मनात प्रश्नही येतो. पण पुढील श्लोकावर 'श्री भगवान् उवाच' तर नाही, मग काय करावे? म्हणून अर्जुनाच्या मनातील प्रश्नही श्रीकृष्णाने जाणून (देवच तो) तो उत्तरही देता झाला!

(३) मूळ गीतेवर स्पष्टीकरण—

ज्ञानेश्वरी ही गीतेवर काटेकोर टीका नसून ओघात आलेले प्रवचन आहे. त्यामुळे अनेकदा श्लोकाचा भावार्थच आला आहे (श्लोक २१,२२) पण कित्येकदा विषय बिंबविण्यासाठी मुळात नसलेले आवश्यक स्पष्टीकरणही करतात. उदाहरणार्थ—

श्लोक २—'भक्तोऽसि मे सखा' यावर 'तूं प्रेमाचा पुतळा' इ. वात्सल्य दर्शविणारे स्पष्टीकरण.

श्लो. ८—'धर्मसंस्थापना' याचे विवरण करताना नीति, विवेक–अविवेक, पापपुण्य यांचा आढावा.

श्लो. ९—'तो चालिला संगे न चाले' इ. मुक्ताचें वर्णन करून ज्ञानेश्वरांनी 'मुक्त' म्हणजे काय याचें स्पष्टीकरण केले.

श्लो. १५—'कर्मच मोक्षहेतु होतात' (८२) असे स्पष्ट सांगितले.

श्लो. १६—'कवि' या शब्दाचे सुंदर स्पष्टीकरण (८६).

श्लो. २३—"कर्म कसें नाहीसें होतें" हे ज्ञानेश्वरांचे.

श्लो. २७—विस्ताराचे सुंदर उदाहरण. श्लोकाचा अर्थ फक्त १३५ व १३६ (यांचाही काही भाग सोडून) ओंव्यांत आहे. बाकी सगळे ज्ञानेश्वरांचे! 'योगाग्नौ जुह्वति' एवढ्यावर ज्ञानेश्वरांनी यज्ञसामग्रीचे विस्तृत वर्णन केले आहे. ८-९ ओंव्या ज्ञानेश्वरांच्या स्वतंत्र असुनही मुळापेक्षा वेगळ्या वाटत नाहीत.

श्लो. ३२—"द्रव्ययज्ञाची अपूर्वाई काय तर स्वर्गफल!" हे स्वतः घालून द्रव्ययज्ञापेक्षा ज्ञानयज्ञ श्रेष्ठ हे सूचित केले.

श्लो. ३६—मुळातील रूपकाचा आश्रय नाही. शिवाय स्वकृत अलंकारांचाही फुलोरा नाही; परंतु ज्ञानामुळे काय होईल याचे सुंदर वर्णन.

श्लो. ३८—ज्ञानासारख्या विषयावर अधिकारवाणीने ज्ञानेश्वरांनीच बोलावे.

श्लो. ४०—संशयापेक्षा घोर पाप नाही हे प्रभावीपणे अनुरूप वर्णन करून सांगितले.

### (४) कार्यकारणसंबंध संगतवार सांगण्यासाठी केलेला विस्तार—

गीतेत फक्त अमुक अमुक होते एवढेच आहे. ज्ञानेश्वर तसे का होते हे सांगून श्रोत्यांच्या मनात विषय मार्मिकपणे ठसवितात.

श्लो. २—हा योग नष्ट का झाला, याची 'अविट नाथिली आस्थाबुद्धि' इ. कारणे सांगितली असून त्या काळचे समाजचित्रणही साधले आहे.

श्लो. ३—युद्धाच्या धुमश्चक्रीत श्रीकृष्ण अर्जुनाला तत्त्वज्ञानाच्या मात्रा कशाला देतो अशी शंका वाचकांना येऊं नये म्हणून 'तुझें अज्ञानत्व हरावें' हे कारण दिले आहे.

श्लो. ७—धर्माच्या अभ्युत्थानासाठी परमेश्वरच का जन्म घेतो तर 'जे धर्मजात आघवें। युगीं युगीं मियांचि रक्षावें।' हे कारण सांगितले आहे.

श्लो. १२—लोक देवदेवतांची पूजा करतात कारण 'बुद्धिभ्रंश.'

श्लो. ३३—ज्ञानयज्ञ श्रेष्ठ का आहे यासाठी ज्ञानयज्ञाची लक्षणे सांगून ज्ञानाचा महिमा गाइला आहे.

### (५) मूलानुसरण न केलेले श्लोक किंवा पदे—

रूपांतर करताना पुष्कळदा ज्ञानेश्वर मुळातील पदे किंवा कधीकधी श्लोकही सोडून देतात.

श्लो. ६—'भूतानामीश्वरोऽपि' चे भाषांतर नाही.

श्लो. १०—'वीतरागभयक्रोधाः' मधील 'भय' या पदाचे विवरण नाही.

श्लो. २३—'ज्ञानावस्थितचेतसः' हे पद गाळले.

श्लो. ४१—मूळ श्लोकातील पदांचा जवळजवळ अर्थच नाही.

### (६) ज्ञानेश्वरांनी स्वयंप्रज्ञेने इतरांहून वेगळे केलेले अर्थ—

ज्ञानेश्वरी ही 'भाष्यकारांतें (वाट) पुसतु' लिहिली आहे हे खरे, परंतु कधीकधी स्वतंत्र अर्थ केले असून ते कित्येकदा मुळाला धरून नसतात.

श्लो. ११—मुळात ‘ सर्वशः ’ म्हणजे ‘ कोणत्याही मार्गाने गेला तर ’ असा अर्थ असताना ज्ञानेश्वरांनी ‘ स्वाभाविकपणे ’ असा अर्थ केला.

श्लो. १७—कर्म, विकर्म, अकर्म या संज्ञांचा अर्थ ज्ञानेश्वरांनी इतरांपेक्षा वेगळा केला आहे. विकर्म म्हणजे विशेष कर्म व अकर्म—अप्रशस्त कर्म हे ज्ञानेशांचे अर्थ आहेत.

श्लो. १८—अकर्माचा निष्कर्म असा अर्थ.

श्लो. ३५—मुळात ‘ सर्व भूते तुझ्या ठिकाणी व माझ्या ठिकाणी ’ असे असताना ‘ तुझ्यासहित सर्व भूते माझ्या ठिकाणी ’ असा अर्थ केला.

(७) मुळाची व गीतार्थटीकेची सरमिसळ--

कित्येक ठिकाणी एका श्लोकावरील ओव्या ह्या दुसऱ्याच श्लोकावर आढळतात. परंतु याचे कारण इतिहासाचार्य राजवाडे यांच्या मताप्रमाणे सलग ज्ञानेश्वरीत पोथीच्या लेखकाने श्लोक मागाहून घातले हे असू शकते.

श्लो. ५--‘ मी अजुहि परि संभवे ’ ही ओवी ६ व्या श्लोकावर पाहिजे. (इतर प्रतीत आहेही.)

श्लो. ८--‘ हेंचि ओलखे तो विवेकिया ’ हा पुढील श्लोकातील ‘ यो वेत्ति ’ चा अनुवाद आहे.

श्लो. १३-१४-१५--वरील ओव्यांत सरमिसळ आहे. इतर प्रतींत ज्या श्लोकावरील ओव्या त्यावरच आहेत.

श्लो. १९--‘ परि क्रियाकलापु आघवा ’ ही ओवी १८ व्या श्लोकाच्या उत्तरार्धाचे सुंदर भाषांतर. ९४ ते १०१ ओव्या १८ व्या श्लोकावरील आहेत.

श्लो. २३-२४-२५—वरील टीकेत सरमिसळ. १२५ वी ओवी श्लोक २६ नंतर हवी.

श्लो. ३४—याच्या उत्तरार्धाचा अर्थ ३५ व्या श्लोकावरील १६६ व्या ओवीच्या पूर्वार्धात !

मूळानुसरणाचा वर जो तौलनिक विचार केलेला आहे त्यावरून असे

दिसते की, ज्ञानेश्वरांची प्रवृत्ती गीतेचा संपूर्ण अर्थ मराठीत जसाचा तसाच आणावा अशी नव्हती. तसेच ज्ञानेश्वरांच्या ठिकाणी भाष्यकारांचा अभिनिवेशही नव्हता. त्यांच्या गीतार्थात जशी काव्यमयता आहे तशीच एक प्रकारची कलात्मक स्वैरताही आहे. श्रेष्ठ प्रतिभावान् कवीला शोभण्यासारखी विषयांत रंगून जाण्याची त्यांची प्रकृति आहे. तशीच आपण ज्या रंगात रंगलो त्याची प्रतीती श्रोत्यांनाही यावी अशी या टीकेची घडण आहे. अर्थात् स्वाभाविकपणेच त्यांच्या टीकेचे स्वरूप रसमय झाले आहे, हे 'जेयाचें बरवेंपणीं । कीजे आठां रसांची ओलावणी ' इ. उद्गारांवरून स्पष्ट होते. आधीच ज्ञान हा विषय, आणि त्याचा व्याख्याता साक्षात् ज्ञानेश्वर. आत्मज्ञान हा त्यांच्या प्रतिपादनाचा स्थायी भाव. अशा परिस्थितीत गीतार्थग्रथनाच्या मिषाने 'तो शांतुचि अभिनवैल ' हे वेगळे सांगणे नको.

हे करीत असताना आपण ईश्वरभक्ताचा संवाद वर्णीत आहो याकडे ज्ञानेश्वरांचे दुर्लक्ष झालेले दिसत नाही. श्रीकृष्णार्जुनाच्या हृदयसंवादाबरोबर वक्त्याश्रोत्यांचा हृदयसंवादही निर्माण करण्याचे सामर्थ्य ज्ञानेश्वरांच्या शब्दाशब्दात प्रतीत होते.



## ५. सामाजिक परिस्थितीचे प्रतिबिंब :

ज्ञानेश्वरांसारख्या कोणत्याही श्रेष्ठ प्रतीच्या व प्रतिभासंपन्न कवीच्या काव्यात जी प्रतिमा-सृष्टी दिसते तीवरून त्या कवीचे अंतर्मन, त्याच्या आवडीनिवडी व त्याची कलादृष्टी कळून येते. असा कवि कितीही आत्मनिष्ठ दृष्टीने आपले काव्य करीत असो; व तो तत्कालीन परिस्थितीच्या बाबतीत जागरूक असो वा नसो; त्याच्या काव्यात भोवतालच्या सामाजिक परिस्थितीचे प्रतिबिंब पडणे अपरिहार्य आहे. वस्तुतः ज्ञानेश्वरांनी समाजस्थितीचे दर्शन घडवून आणावे या हेतूने काहीही लिहिले नाही. तथापि त्यांची चोखंदळ व सूक्ष्म निरीक्षणशक्ती अशी आहे की, तीमुळे आज सुमारे ७०० वर्षे होऊन गेली तरी ज्ञानेश्वरी वाचत असताना आपण जणू काही त्यांच्याच काळात वावरत आहो असा भास झाल्याविना राहत नाही.

ज्ञानेश्वरांचा काळ म्हणजे महाराष्ट्राच्या इतिहासातील एक वैभवशाली व सुखसमृद्धीचा काळ होय. त्यावेळी कलाभिज्ञ व न्यायी अशा रामदेवराव जाधवाचे राज्य होते हे,

तेथ इंदुवंशविलासु । जो सकलकलां निवासु ।
न्यायातें पोखीत क्षितीशु । श्रीरामचंद्रु ॥ १८. १७८३ ॥

या उल्लेखावरून स्पष्ट होते. 'सकलकलानिवासु' राजा असल्यानंतर समाजात ललितकलांना उत्तेजन असणे हे स्वाभाविकच आहे.

कां बहिरांचिये आस्थानीं । कव्हणीं गीतांतें हानमानी ॥ २२ ॥
तैसा अमुर्तु चि मीं किरीटी । परि प्रकृतीतें जै अधिष्ठीं
तैं साकारपणें नटी । काजा एया ॥ ४७ ॥
एकां वैराग्यरवी विवलले । तवं संगती विहार केले ॥ १२६ ॥
तरी स्पर्शें जीववी । स्वादें जीभेतें नाचवी ॥ २१८ ॥

या ओव्यांवरून ज्ञानेश्वरांच्या काळात संगीत-सभा भरत असत, नाटके होत असत, यज्ञ करण्यासाठी विहार-शिल्प केलेले असत व नृत्य हे आनंदाचे चिन्ह होय याची जाणीव होती असे सहजच अनुमान निघते.

ललितकलांप्रमाणेच विविध उपयुक्त कलांचाही निर्देश अनेक ठिकाणी केलेला आढळतो.

जैसे कां कुडें नाणें । खरेयाचेनि सारिखेपणें
डोलेयाचेंही पाहणें । संशई घाली ॥ ८५ ॥

यावरून बेमालूमपणे खोटी नाणी पाडण्याची करामत त्याकाळीही रूढ होती. 'त्रैलोक्यपटाची घडी' (१४) आणि 'पाटाउवे' (२१) या उल्लेखांवरून आजपर्यंत ज्या रेशमी वस्त्रांना 'पैठणी' हे नाव चालत आले आहे त्यांची बोलकी खूण पटते.

ज्ञानेश्वरांच्या सभोवती नाना प्रकारच्या व नाना व्यवसायांच्या व्यक्ती कोणत्या वावरत होत्या याचे सुरेख शब्दचित्र पुढील ओव्यांत रेखाटलेले आढळेल—

यऱ्हवि तऱ्ही खवणेयाचा गावीं । पाटाउवे काइ करावीं (२१)
दोषांचें लिहिलें फेडी (५२)

परत्रीक स्तांघिजैल काइ (१५३)
बें न विसंमिति अंजन । उन्मेखनेत्रीं (१५७).
सज्जनांकरवि गुढी उभविं मीं (५२).
तैं साकारपणें नटीं (४७).
जैसें कां कुडें नाणें । खरेयाचेनि सारिखेपणें (८५).

या उल्लेखांवरून ज्ञानेश्वरांच्या काळी नग्नपणे हिंडणारे जैन क्षपणक, कुंडलीत ‘ लिहिलेले ’ किंवा हात पाहून भविष्य ‘ सांगणारे ’ कुडमुडे जोशी, डोळयात अंजन घालून गुप्त धनाचा ठावठिकाणा लावणारे पायाळू, आनंदाने गुढ्या उभारणारे उत्सवप्रिय, हुबेहुब सोंग आणणारे बहुरूपी, खोटी नाणी पाडून हातोहात ठकविणारे लफंगे अशा विविध प्रकृतींच्या व्यक्ती त्यावेळच्या समाजात वावरत असाव्यात हे सहजच कळून येते.

ऐसाही जऱ्हीं थोरावे । तऱ्हीं उपायें एकें आंगवे
जरि हातीं होये बरवें । ज्ञानखड्ग (२०५)
जरि मैत्रेंचि वैरी मरे । तरि वाया कां बांधावे कटारे (२२०)

या उल्लेखांवरून स्पष्ट होते की, यादवकाळात एखादा प्रबल शत्रू चालून आला असता हाती खड्ग घेण्याचा उपाय रूढ होता व वैरी मारण्यासाठी कमरेला कट्यारी बांधण्याचीही पद्धत होती. अशी स्वसंरक्षणक्षमता लोकांच्या अंगी असणे हे त्या काळाला अनुरूपच आहे. राजवाडे-प्रतीतील ‘ मैत्रेंचि वैरी मरे ’ या ऐवजी इतर प्रतींतील ‘ मंत्रेंचि वैरी मरे ’ असा पाठ घेतल्यास मंत्राने शत्रूचा काटा काढण्याचा प्रघात प्रचलित होता, असे म्हणावे लागते.

ज्ञानेश्वर हे स्वतः महायोगी असले तरी कौटुंबिक वातावरणाचे त्यांचे निरीक्षण सूक्ष्म आणि मार्मिक आहे. त्यांच्या काळी विवाहसमयी वधूवरांचे मळवट भरीत असत, हे ‘ धर्मासि नीतीसीं सेंस भरी ’ (५२) यावरून उघड दिसते. ‘ परां विरक्ती माल न घलिचि ’ (१५२) या ओवीवरून वधूने वराला माळ घालण्याची किंवा न घालण्याची मुभा अर्थात् स्वयंवराची पद्धतीही ज्ञात होती, असे अनुमान निघते व या अनुमानाला पुढील ओवीचाही आधार मिळतो.

' अविवेककुमारत्वा मूकले । जेयां विरक्तीचें पाणिग्रहण जालें ' (१२१) अर्थात् त्याकाळी कुमारावस्था संपल्यानंतर विवाह होत असत. ही पद्धती स्वयंवरांतील स्वयं-निर्णयास अनुकूलच आहे. कारण याच ओवीवरून बालविवाह बहुधा होत नसावे असाही तर्क करता येतो. ज्ञानेश्वरीत साधारणतः संसारसुखाच्या गोडीचे वातावरण (१८६) असले तरी ' घर रिघावें ' (५) या वाक्प्रचारावरून विवाहबाह्य घरठावाचे सुख भोगणारी स्त्रीही नव्हती असे नाही, असा कयास बांधता येतो.

तथापि, वरील सर्व कौटुंबिक उल्लेखांपेक्षा ज्ञानेश्वरांनी स्त्रियांच्या पातिव्रत्याच्या थोरवीचा केलेला उल्लेख हा विशेष उठावदार आहे. ज्ञानेश्वरीत सर्व रसांना ज्यावरून ओवाळून टाकावे अशा शांत रसाचे महत्त्व प्रतिपादन करताना ज्ञानेश्वर म्हणतात—

जे साहित्य आणि **शांती** । हे रेखा दिसे बोलती
जैसी लावण्यगुणयुवती । आणि **पतिव्रता** ॥ २१५ ॥

या ओवीत साहित्य हा रेखेचा बाह्यगुण स्त्रीच्या लावण्याप्रमाणे आहे परंतु शांतरस हा मात्र तिचे साक्षात् पातिव्रत्य होय, असे म्हणून ज्ञानेश्वरांनी पातिव्रत्याचा जो गौरव केला आहे त्यावरून ज्ञानेश्वरकाळीं पातिव्रत्य हा श्रेष्ठ सामाजिक आदर्श होता, हे सूर्यप्रकाशाइतके स्पष्ट आहे.

## ६. चौथ्या अध्यायातील काव्यसौंदर्याची उकल :

ज्ञानेश्वरीतील एक एक ओवी म्हणजे सौंदर्याची खाणच आहे. परंतु या ठिकाणी त्या सौंदर्याचे काही थोडे विशेषच वानगीदाखल देणे इष्ट होईल.

**शब्दकळा**

ज्ञानेश्वरांच्या शब्दकळेचे वर्णन त्यांच्याच शब्दात करावयाचे म्हणजे

जैसे बिंब तरि बचके येवडे । परि प्रकाशा त्रैलोक्य थोकडें
शब्दाची व्याप्ति तेणें पाडें । अनुभवावी ॥ ४. २१२ ॥

असें करता येईल. त्यांचे शब्द वापरण्याचे कौशल्य ' क्रांतदर्शी (८७), क्रियाकलापु (९४), प्रतिस्फले (७१), नव्हाली (१५६), आगाणुका

(२२२) ' इ. शब्दांवरून स्पष्ट होईल. 'एथ मोहल्ले गा क्रांतदर्शी' या चरणात मूळातील 'कवयोऽप्यत्र मोहिताः' या शब्दांचे ज्ञानेश्वरांनी सहज केलेले रूपांतर मार्मिक आहे. 'कवयोऽपि' (कविसुद्धा) या दोन शब्दांसाठी ज्ञानेश्वरांनी 'क्रांतदर्शी' हा एकच प्रतिशब्द वापरून श्रेष्ठ कवी हा कसा अतींद्रियवादी (Transcendentalist) असतो हे दर्शविले आहे. ज्ञानेश्वरप्रतिभानिर्मित 'क्रांतदर्शी' हे कवी या शब्दाचे निर्वचन साक्षात् ज्ञानेश्वरांनाच किती चपखल रीतीने शोभून दिसते !

### शब्दचित्र

चित्रकार ज्याप्रमाणे सूक्ष्म रेखेच्या साहाय्याने एखादे चित्र रेखाटून त्यातील भाव मूर्तिमंत आपल्या डोळ्यांसमोर उभा करतो त्याप्रमाणे ज्ञानेश्वर आपल्या शब्दरूपी कुंचल्याच्या साहाय्याने अर्थाचे जिवंत चित्र आपल्यासमोर उभे करतात. रसभावपूर्ण अशा रेखाटनास ज्ञानेश्वरांनी 'रेखा' ही अन्वर्थक संज्ञा (२१५) निर्माण केली तिचाही उल्लेख या अध्यायात आलेलाच आहे.

> यऱ्हवीं तऱ्ही खवणेयाचां गांवीं
> पाटाउवें काइ करावी ।। २१ ।।
> नावे हान रिगे । तो थडियेचे रुंखजात देखे वेगें
> साचोकारें पाहों लागे । तंव रुख म्हणे अचल ।। ९६ ।।

या ठिकाणी दिगंबर जैन साधूंच्या मेळाव्याचे आणि नौकेत बसून वेगाने जाणाऱ्या माणसाचे हुबेहूब चित्र डोळ्यांसमोर उभे राहते.

### अर्थगौरव

ज्ञानेश्वरांची शब्दकळा जशी व्यापक आणि सूक्ष्म आहे त्याप्रमाणे त्यांच्या ओवीत अर्थगौरवही भरपूर आहे त्याचे वर्णन खुद्द ज्ञानेश्वरांच्याच शब्दांत करावयाचे म्हणजे त्यांचे 'मऱ्हाटे बोल । जे समुद्राहीहुनि खोल । अर्थ भरित ' असे आहेत.

> आता अविवेककुमारत्वा मुकले । जेयां विरक्तीचें पाणिग्रहण जाले
> मग उपासन जिहिं आणिलें । योगाग्नींतें ।।१२१।।

या ओवीत अविवेकावर कुमारत्वाचा आरोप केल्ला असला तरी त्या रूपकातून कुमारावस्थेत अग्निहोत्राचा स्वीकार करता येत नाही व अग्नि-

होत्र घेणाऱ्याचे विरक्तीशी लग्न लागल्याशिवाय योगाग्नीचे उपासन प्राप्त होऊ शकत नाही. त्याचप्रमाणे योग हा शब्द मुळात नसताना 'ब्रह्माग्नी' याचे 'योगाग्नी' असे रूपान्तर करून या एका ओवीत किती खोल अर्थ भरला आहे! 'विरक्ती' हा स्त्रीलिंगी शब्द आणि 'उपासन' हा नपुंसकलिंगी शब्द वापरून ज्ञानेश्वरांनी, कौमार्यावस्था संपवून तारुण्यावस्थेत 'स्त्री' शी धर्मविवाह केल्याशिवाय 'संतान' निर्मितीचा अधिकार नाही हेही मार्मिकपणे सूचित केले आहे. तसेच १८५ ते १९० या ओव्यांत ज्ञानबीजाचा विस्तार वर्णन केला आहे : "जो श्रद्धेच्या संभोगाने सुखी होतो व ज्याला अचुंबित शांतियुक्त ज्ञानबीजापासून पवित्र असा ज्ञानांकुर प्राप्त होतो त्यास सर्वत्र शांतीचे वातावरण प्रत्ययास येते" यांतून संभोग, अचुंबित, बीज, अंकुर, विस्तार असे सूचक शब्द वापरून ज्ञानेश्वरांनी सुखी संसाराचे सर्वस्वच पटवून दिले आहे.

### सूक्ष्म निरीक्षण

कमळाच्या एका पाकळीतून दुसरी पाकळी जशी स्वाभाविकपणे निघालेली दिसावी तद्वत् ज्ञानेश्वरांच्या एका अर्थातून दुसरा अर्थ सहजगत्या विकसित झालेला प्रतीत होतो. अशा प्रकारच्या अर्थगौरवासाठी सूक्ष्म निरीक्षणाची अत्यंत गरज असते. ज्ञानेश्वरांच्या सूक्ष्म निरीक्षणशक्तीचा प्रत्यय त्यांच्या प्रतिमासृष्टीवरून वारंवार येतो. भाजलेले बी पेरले तरी उगवत नाही, खोटे नाणे हुबेहुब खऱ्या नाण्यासारखे असल्यामुळे पाहणारा संशयात पडतो, अवकाळी आलेले ढग वर्षाव न करता जसे येतात तसे जातात, ज्ञानाचा प्रकाश एकदा का पडला म्हणजे विश्वसंभ्रमरूपी कवडसा कोठेच्या कोठे गडप होतो, इत्यादी ठिकाणी त्यांचे अवलोकन जितके चौफेर तितकेच सूक्ष्म दिसून येते.

### विचाराचे भव्यत्व आणि विशदत्व

महाकवीच्या ठिकाणी असणारे विशदत्व आणि भव्यत्व हे गुण ज्ञानेश्वरीत जागोजागी आढळावे हे स्वाभाविकच आहे.

हें असो विश्व जाला । देहें चि तो (१०१)
सांघे भूतत्रयाची काजळी । जे गगनामाजि उधली

तिये प्रलइचिये वाहुंटली । काइ अभ्र पूरे ।। १७४ ।।

साहाजें मलयानिलु सुंदु । तेया ही होए अमृताचा स्वादु ।
आणि तेथ चि जोडे नादु । दैवंगत्या ।। २१७ ।।

या ठिकाणी ज्ञानेश्वरांच्या प्रतिभेची झेप जितकी तरल तितकीच विश्वव्यापी आहे ! विश्वात व्यापून राहणारा योगी, भूतत्रयाची काजळी, मलयपर्वताहून वाहणाऱ्या वाऱ्याचा अमृतस्वाद आणि दैवगत्या जोडलेला नाद अशा अफाट प्रतिमांचे चित्रण फक्त ज्ञानेश्वरच करू जाणोत.

**ओज : प्रसादमाधुर्य**

ज्ञानेश्वरांच्या अफाट प्रतिमांतून त्यांची ओजोगुण व्यक्तविण्याची शक्ती दिसत असली तरी संपूर्ण ज्ञानेश्वरीत प्रसाद आणि माधुर्य हे तुडुंब भरलेले आहेत. याची उदाहरणे ओवीगणिक सापडतील.

जैसा जो जळापासिं उभा ठाके । तो जऱ्हें आपणपें जळामाजि देखे ।
तऱ्ही निभ्रांत ओळखे । म्हणे मी वेगळा आहें ।। ९५ ।।

यातील प्रसाद आणि

कैसी आगलीक दैवांची । जे गंगा जोडली अमृताची (४)
तरी स्पर्शे सर्वांग जीववी । स्वादें जीभेतें नाचवी (२१८)

यातील माधुर्य जितके स्पष्ट करावे तितके थोडेच आहे. ९५ तील उपमेत पाण्यात प्रतिबिंब पहाणारा मनुष्य आपले वेगळेपण जितके सहजपणे ओळखतो तितक्याच सहजपणे त्या ओवीचाही अर्थ आपल्या मनात येतो. 'अमृताच्या गंगेचे अवतरण' आणि 'सर्वांगावर सुखद रोमांच उत्पन्न करून जिभल्या चाटावयास लावणारी कथा' हे वर्णन मनाला द्रवून टाकणारे नाही काय ?

**भावाची संपत्ति । रसाची उन्नति ।।**

माधुर्यामुळे चित्ताची अत्यंत द्रवावस्था होते, आणि मम्मटाने म्हटल्या- प्रमाणे शांत रसात अत्यंतद्रुतिहेतुत्वामुळे माधुर्याचा अतिशय उतरलेला असतो. ज्ञानेश्वरांनीच म्हटल्याप्रमाणे

'कवित्वीं बरवें रसिकत्व'

हें संस्कृतातील 'वाक्यं रसात्मकं काव्यम्' या व्याख्येला जुळण्यासारखेच

आहे. परंतु लौकिक आठ रसांच्या पेक्षा वरचढ असलेला आणि

जेयाचां बरवेंपणीं । कीजे आठां रसांची ओलावणी

असा शांत रस हा आठही रसांना व्यापून राहून शिवाय स्वतंत्रपणे व्यक्त झालेला आहे. हे ज्ञानेश्वरांचे मत संस्कृतसाहित्यशास्त्रातील शांतरसप्रतिपादक अभिनवगुप्ताच्या मताशी जुळणारे आहे. (' तो शांतुचि अभिनवैल, २११ या ठिकाणी ज्ञानेश्वरांनी शांतरसाचे अभि–नव रूप आणि ' अभिनव ' गुप्ताचा उल्लेख ' अभिनवैल ' या सूचक शब्दाने केल्यासारखा दिसतो. ' अभि–नव ' अर्थात् श्रेष्ठ असा नववा रस म्हणजे शांत रस होय याचीही सूचना येथे मिळते. )

ज्ञानेश्वरांच्या मते––

जे साहित्य आणि शांती । हे रेखा दिसे बोलती ।
जैसी लावण्यगुणयुवती । आणि पतिव्रता ॥ २१५ ॥

साहित्य ही काव्यरेखेची बाह्यशोभा असून शांतरस हा तिचा आत्मा आहे. ज्ञानेश्वरीत शांतरसाचा आविर्भाव सर्वत्रच आहे. किंबहुना ' शांताचेया घरां ' अद्‌भुत आला असून भक्ताच्या प्रेमासाठी गीतार्थग्रथनाच्या मिषाने ज्ञानेश्वरांनी शांतरसाचा वर्षावच केलेला आहे (१८.१७४०).

ज्या ठिकाणी बोलापरौते बोलणें आहे त्या ठिकाणी शांतरसाची भरती पात्रांतून ओलांडून जाते (५–६४) असे प्रसंग चौथ्या अध्यायात अनेक आहेत.

तेणें न पातां विश्व देखिलें । न करितां सर्व केलें
न भोगितां भागिलें । भोग्यजात ॥ १०० ॥

हे आत्मज्ञानी मनुष्याचे वर्णन, आणि

मनाचें मनपण गेलें । जेथ बोलांचें बोलणें ठेलें
जेयामाजि सांपडलें । ज्ञेय दिसे ॥ १६१ ॥
जेथ वैराग्याचा पांगु फीटे । विवेकाचाही सोसु तुटे
जें न पातां साहाजें भेटे । आपणापें ॥ १६२ ॥

इत्यादी ज्ञानयोगाचे वर्णन म्हणजे " जेथ शांतु दिसैल उघडा " ( ६-४८६ ) अशाच प्रकारचे आहे यात शंका नाही.

ज्ञानेश्वरीचा चौथा अध्याय हा ज्ञानयोगाला किंवा कर्मब्रह्मार्पण-योगाला वाहिलेला असल्यामुळे त्यात शांतरस हा विपुल असणे स्वाभाविकच आहे. संस्कृत साहित्यशास्त्रकारांनी शांतरसाचा स्थायी भाव 'शम,' 'निर्वेद,' 'तृष्णाक्षयसुख' आणि 'आत्मा' हेच मानलेले असून ज्ञानेश्वरही याच स्थायी भावाचा

रसिकांवीही **परतत्त्व** ।--स्पर्श जैसा (१८.३४५)

या प्रसिद्ध ओवीत 'परतत्त्वस्पर्श' असा उल्लेख करतात. परतत्त्वस्पर्श म्हणजे आत्मतत्त्वाचे किंवा ईश्वरी तत्त्वाचे प्रतिपादन होय. हे प्रतिपादन विषयविमुखतेच्या द्वारे केल्यास त्याचे पर्यवसान शांतरसात होते. आणि तेच प्रतिपादन 'ईश्वराची खूण' पटविण्यासाठी केले की, त्या ठिकाणी 'भाव' निर्माण होतो. ज्ञानेश्वरी ही एक 'कथा' असून त्या कथेच्या संगतीत भावाची संपत्ति व रसाची उन्नति होणार आहे हे

ते कथेची संगति । **भावाची संपत्ति**
रसाची उन्नति । म्हणिपेल पुढां ।। ४.२११ ।।

(प्रस्तुत ओवी राजवाडे प्रतीत नाही. साखरे, भिडे, दांडेकर यांच्या प्रतीत आहे. ) या ओवीत ज्ञानेश्वरांनी स्पष्ट सांगितलेच आहे.

ज्ञानेश्वरीत नवरसांचे सागर आहेत, तसेच तीत भावार्थाचे गिरिवरही अपेक्षित आहेत ( १२.११ ). या त्यांच्या उद्गारांवरून भावार्थाचा किंवा भावाचा समावेश नवरसांत होत नसून त्याला रसनिरपेक्ष असे स्वतंत्र अस्तित्व आहे असे दिसते. मम्मटादी साहित्यशास्त्रकारांनी 'रतिर्देवादि-विषया व्यभिचारी तथाञ्जितः ।' या अर्थाची जी भावसंज्ञा उपयोजिली आहे तिचा व ज्ञानेश्वरांच्या भावसंज्ञेचा संकेत बहुधा एकच असावा. ज्ञानेश्वर ज्याला भाव समजतात त्यालाच नंतरच्या संतकवींनी 'भक्तिरस' अशी संज्ञा दिली आहे.

जें न सांघेचि पितया वसुदेवासी । जें न सांघेचि मातें देवकीसी
जें न सांघेचि बंधु बळिभद्रासी । तें गुह्य अर्जुनेंसीं बोल्त ।। ४.८ ।।

ही सांप्रदायिक प्रतीतील ओवी राजवाडे-प्रतीत नाही. पण यापुढील

देवी लक्ष्मी येतुली जवळीक । परि तेहि येयां प्रेमाचें नेदखेचि सुख ।

आजि कृष्णस्नेहाचें पीक । ययातेंचि आथी ॥ ८ ॥
सनकादिकाचेया दुरासा । वाढिनलेया किर बहुवसा
परि तियाहीं येणें मानें एषा । येंतिची ना ॥ ९ ॥
यया जगदीश्वराचें प्रेम । एथ दिसतसे निरूपम
कैसें पार्थे येणें सर्वोत्तम । पुण्य केलें ॥ १० ॥
हो काज एयाचेया प्रीती । हा अमूर्तु आला व्यक्ति
मज एकवंकिचिया स्थिती । आवडतसे ॥ ११ ॥

या सर्वच प्रतींतील प्रास्ताविक ओव्यांतून अर्जुनाच्या प्रेमामुळे देव कसा आधीन झाला, व त्याचे प्रेम ईश्वराच्या निकटवर्तियांच्या प्रेमापेक्षाही कसे श्रेष्ठ आहे हे सनक, सनंदन, सनत्कुमार व सनकसुजात, लक्ष्मी, वसुदेव, देवकी, बळिभद्र यांची उदाहरणे देऊन स्पष्ट केले आहे.

ऐसें सर्वज्ञाचा बापु । जो कृष्ण ज्ञानदीपु ।
तो म्हणतसे सकृपु । आइकै राया ॥ २०८ ॥

या अखेर अखेरच्या ओवीत, चौथ्या अध्यायाच्या प्रारंभी जो ‘ अनादि आणि निष्कंप ’ होतो तो ‘ कवणें मानें सकृप जाला ’ याचे अनुसंधानपूर्वक भक्तिभावात्मक वर्णन केले आहे.

तंव अर्जुनु म्हणे हरी । माये आपुलेयांचा स्नेहो करी
एथ विस्मयो काइ । अवधारी कृपानिधी ॥ ३१ ॥
तूं सर्वंसारश्रांताची साउली । अनाथांची माउली
आमतें किर प्रसवली । तूझीचि कृपा ॥ ३२ ॥
देवा पांगुल एकाधें वीजे । तरि जन्मौनि जोजारू साहिजे
हें बोलों काइ तूझें । तुजचि पुढां ॥ ३३ ॥

चौथ्या श्लोकावरील या टीकेत श्रीकृष्णावरील अर्जुनाच्या भक्तीला वात्सल्याचा उजाळा दिल्यामुळे येथील भक्तिभावाला विशेष उत्कटता आली आहे. भक्तिरसाच्या उठावाला मातृप्रेमाचा दाखला, संसारश्रांतांची साउली व अनाथांची माउली यांतील रूपकाची कुसरी आणि यमकानुप्रासाची गोडी सहृदयाला आल्हाद देणारी आहे.

एकंदरीने चौथ्या अध्यायात शांत रसाचा परिपोष मूळ विषयानुरूप

भक्तियोग गौण ]
सर्वत्रच असला तरी श्रीकृष्ण–अर्जुन यांच्यातील ‘ भक्तीचा जिव्हाळा ’ अनेकवार वर्णन केल्यामुळे जणू काही ‘ शांताचेया घरां । भाव आला आहे पाहुणेरा ’ असे म्हणावेसे वाटते.

शांत आणि भक्ती या रसांच्या ओलाव्यामुळे हे सारस्वताचे झाड अलंकारांच्या फुलौऱ्याने डवरून आले आहे. याचे विस्तृत दिग्दर्शन अलंकारांवरील प्रकरणात केलेले आहे.



## ७. ज्ञानेश्वरांची अलंकारचातुरी

अलंकार हे केवळ काव्याच्या बाह्य शोभेचे धर्म नसून ते ध्वनित असले तर अशा अलंकार-ध्वनीचे पर्यवसान ‘ वस्तुतः काव्याचा आत्मा जो रस ’ त्यांतच होते, हा संस्कृत साहित्यशास्त्राचा एक महत्त्वाचा सिद्धान्त आहे. पाश्चात्य काव्यमीमांसेत अलीकडे प्रतिमाबद्ध विचार हेच काव्याचे मूळ तत्त्व मानलेले आहे. अशा प्रकारची ‘ प्रतिमा ’ निर्माण करणारे शब्द हे अनलंकृत क्वचितच असतात. एका इंग्रज टीकाकाराने तर स्पष्ट म्हटलेच आहे की, प्रत्येक प्रतिमा ही बहुधा रूपकात्मक असते. रूपकादि सादृश्यमूलक अलंकारांची जननी म्हणजे उपमा होय. हे सर्व सादृश्यमूलक अलंकार ज्या उपमानावर आधारलेले असतात ती उपमाने म्हणजेच पाश्चात्य काव्यमीमांसेतील प्रतिमा (images) होत.

कोणताही अभिजात कवी एखादी उपमा, उत्प्रेक्षा किंवा रूपक अशा काही चातुर्याने वापरतो की आपल्या मनात त्याला जाणवलेल्या विशिष्ट अनुभूतीची एक प्रतिमाच तो निर्माण करतो. आपल्या प्रतिमा-निर्माण-क्षमतेमुळेच कवी हा जीवनातील आणि वाङ्मयातील तत्त्व उकलून दाखविणारा एक महान् भाष्यकार होऊ शकतो.

ज्ञानेश्वरांची अलंकारसृष्टी ही सादृश्यावर अधिष्ठित असल्यामुळे तीत उपमा-दृष्टान्तादी सादृश्यमूलक अलंकारांव्यतिरिक्त इतर अलंकार क्वचितच येतात. त्यांतही त्यांचा भर उपमा, दृष्टान्त व रूपक या तीन अलंकारांवरच जास्त आहे. अलंकारांत जरी विविधता नसली तरी प्रतिमासृष्टीत मात्र

प्रत्ययास येते. संगीत, जोतिष, नाट्य, अमृत, अन्न, चांदणें, चंदन, झाड, नदी, दीप, बिंब, चंद्र, सूर्य, आकाश, पतिव्रता, लफंगे, रखेली अशा नाना प्रकारच्या प्रतिमानांचा त्यांच्या काव्यसृष्टीत आढळ होतो.

## उपमा व दृष्टान्त

मात्र ज्ञानेश्वरांचे अलंकार साहित्य-शास्त्रीय कसोटीला लावले तर ते पूर्णपणे उतरतील असे नाही. वास्तविक त्यांच्या पुष्कळशा उपमा ह्या दृष्टान्तच आहेत. कारण त्यांत बिंबप्रतिबिंब-भाव स्पष्ट असतो. फक्त त्यात ' जैसे, तैसे, जेवि ' इ. उपमादर्शक शब्द असतात एवढेच ! याचा अर्थ ज्ञानेश्वरीत केवळ उपमा किंवा केवळ दृष्टान्त नसतातच असे मात्र नाही. मात्र अशाही उपमेत उपमेय व उपमान यांच्या लिंगवचनांचे ऐक्य ज्ञानेश्वर नेहमीच साधतात असे नाही. त्यांचा जोर फक्त साधर्म्यदर्शनावरच असतो.

शून्य जैसें गृह । कां चैतन्येंवीण देह
तैसें जीवीत तें संमोह । ज्ञानहीन ॥ २९२ ॥

येथे ज्ञानहीन जीवीत कसे असते याचे मार्मिक उपमेने दर्शन घडविले आहे. या ठिकाणी पदार्थोपमा आहे. वाक्यार्थोपमा नाही, अर्थात् तीत दृष्टान्त अलंकाराचे मिश्रण नाही. तसेच,

सांघैं भूतत्रयाची काजली । जे गगनामाजि उधली
तिये प्रलइचिये कार्हुटलि । काइ अभ्र पुरे ॥ १७४ ॥
किं पवनाचेनि कोपें । पाणियें चि जो पलिपे
तो प्रलयानलु काइ दडपे । तृणें नावें ॥ १७५ ॥

या ठिकाणी ज्ञानशक्तीचे सामर्थ्य वर्णन करताना ज्ञानेश्वरांनी दृष्टान्त दिले आहेत. ते विषयानुरूप भव्य असल्यामुळे मूळ विषय श्रोत्यांच्या मनावर अधिकच बिंबतो, हे सांगणे नको.

मात्र ज्ञानेश्वरीत दृष्टान्तमूलक उपमाच बहुधा आढळतात. त्यांत एका वाक्यार्थाची दुसऱ्या वाक्यार्थाशी तुलना असल्यामुळे त्यांना दृष्टान्तमूलक ' वाक्यार्थोपमा ' असे म्हणावे लागते. अशी उदाहरणे चौथ्या अध्यायात

सर्वत्र आहेत. ( पाहा. ३, २१–२४,४६,४७,६३,६४,७३–७५,८२,८५, ८६,९५–९९,११६,११७,१५७,२१२,२१३,२१५ इ०)

**रूपकाचिया कुसरी**

यानंतरचा प्रमुख अलंकार म्हणजे रूपक. एकामागून एक रूपके देण्यात ज्ञानेश्वर सिद्धहस्त आहेत. त्यांची सांग रूपके व माला रूपके विशेष प्रसिद्ध आहेत. वानगीदाखल एक उदाहरण पाहा––

तिहिं विरक्तिची ज्वाला घेतली । तवं विकाराचीं इंधने पलिपलीं
तेथ आशाधूमें सांडिलीं । पांचै कुंडें ॥ १२७ ॥

(याशिवाय १, १४, २८, ३२, ५०, ५३, ५५, ६१, १०४, १०६, १२६, २९, ३३-३४, ३७, ५८, १६९-७०, २०८ इ. ओव्या.)

'उपमा ज्ञानेशाची' किंवा 'दृष्टान्तो ज्ञानदेवस्य' यावरून ज्ञानेश्वरांनी मुख्यत्वेकरून वापरलेले अलंकार उपमा, दृष्टान्त होत हे खरे. पण क्वचित्प्रसंगी इतरही अलंकार ज्ञानेश्वर वापरतात हे पुढील उदाहरणांवरून दिसून येईल.

**अनन्वय**

उपमेयास उपमेय हेच उपमान असू शकते तेंव्हा अनन्वय अलंकार होतो.

जैसी अमृताची चवि निवडिजे । तरि अमृताचि सारिखी ह्मणिजे
तैसे ज्ञान हें उपमिजे । ज्ञानेंसींचि ॥ १८१ ॥

जेंव्हा उपमेयास उपमान असणें शक्य नाही असे वर्णन असते तेंव्हाही अनन्वय अलंकारच होतो.

पुडुतीं ज्ञानाचेनि पाडे । पवित्र न दिसे ॥ १७६ ॥

असे ज्ञानशक्तीचे वर्णन करताना म्हटलें आहे.

("अनन्वयाच्या या प्रकारास कोणी असमालंकार असे म्हणतात." अलंकारचंद्रिका.)

**उत्प्रेक्षा**

तो देहसंगें तरि असे ।
परि चैतन्यासारिखा दीसे (११४)

येथे उपमेयावर ते जणू काही उपमानच आहे अशी साधर्म्य-मूलक संभावना 'दीसे' [ गमे, भासे ] या शब्दावरून प्रतीत होते, म्हणून उत्प्रेक्षा.

**अपह्नुती**

'तो ब्रह्मचि मनुष्यवेखें । ॐ लख तूं' ।। १०४ ।।

येथे प्रस्तुताच्या (मनुष्य) स्वरूपाचा निषेध स्पष्ट नसून वेख (मिष) या शब्दाने सूचित केलेला असल्यामुळे येथे आर्थी अपह्नुती आहे.

**व्यतिरेक--**

तो शांतुचि अभिनवैल । ते परियसां मऱ्हाटे बोल
जे समुद्राहीहूनि खोल । अर्थभरित ।। २११ ।।

उपमानापेक्षा (समुद्र) उपमेयाचे (मऱ्हाटे बोल) आधिक्य वर्णन केल्यामुळे व्यतिरेक अलंकार झाला.

**विरोधाभास--**

ह्याची उदाहरणे चवथ्या अध्यायात ५७, ५८, ६८, ६९, १००, १०१, ११३ इ. ओव्यांत आहेत.

"जेव्हा वस्तूंच्या गुणक्रियादिकांमध्ये वास्तविक विरोध नसूनही त्यांच्यात विरोध आहे, असे कविप्रतिभानिर्मित वर्णन असते, परंतु अशा विरोधाचा परिहारही करता येतो तेव्हा विरोधाभास अलंकार होतो." जसे,

तेणें न पांतां विश्व देखिलें । न करितां सर्व केलें
न भोगितां भोगिलें । भोग्यजात ।। १०० ।।

किंवा याउलट,

तो चालिला संगे न चले । देहिचा देहा नाकले ॥ ५८ ।।

यात विरोध दिसतो. पण 'फलाची अपेक्षा नसणारा मनुष्य' असा कर्ता घेतल्यास हे कोडे सोडविणे कठीण नाही.

**पर्यायोक्त--**

'सज्जनाकरवि गुढी उभवीं मी'
किंवा 'भक्तांसि होंति दोंदें सात्त्विकाची' (५४)

यावरून भक्तांना आनंद, सुख देतो असा अर्थ पर्यायाने निष्पन्न होतो. म्हणून येथे पर्यायोक्त समजावा.

**सार**

उत्कर्ष किंवा अपकर्ष पायरीपायरीने दाखविणे यास सार अलंकार म्हणतात.

उदा० आदी चि विवेकाची गोठी । वरी प्रतिपदी कृष्णु जगजेठी
भक्तराजु किरीटी । परिसतसे ।। २ ।।

आधी विवेकाची गोष्ट सांगतोच कोण? सांगितली तरी लुंग्यासुंग्यांनी सांगून काय फायदा ? त्यासाठी अधिकारी वक्ताच हवा ! बरे, असा वक्त असला तरी खरा श्रोता मिळणे म्हणजे अत्यंत कठीण. एक वेळ वक्ता मिळू शकेल पण अर्जुनासारखा भक्तशिरोमणि श्रोता मिळणे हे श्रीकृष्णाचे भाग्य असे म्हटल्यास अत्युक्ति होणार नाही.

अशा रीतीने येथे उत्तरोत्तर उत्कर्ष दाखविला आहे.

**अतिशयोक्ती**

काव्यात अतिशयोक्ती ही असतेच. अतिशयोक्तिदर्शक "लोकप्रसिद्धीचा अतिक्रम" हा 'यदि' या अर्थाच्या 'जरि' शब्दाने दर्शविला असल्यामुळे,

ना तरि पृथ्वीचेनि पाडें । कांटाळें जरि जोडे
तरि ज्ञानासि उपमा घडे । पांडुकुमरा ।। १७९ ।।

या ओवीत 'यद्यर्थातिशयोक्ती' अलंकार झाला.

**समासोक्ती**

प्रकृताच्या वर्णनावरून विशिष्ट शब्दांमुळे अप्रकृताच्या व्यवहाराचाही बोध होतो तेथे समासोक्ती.

'विरक्ति माल न घलि' आणि 'श्रवणेंद्रियाचें घर रिघावें' यातून स्त्रीविषयक व्यवहाराचा बोध होतो. तसेच,

जेथ प्रवृत्ति पांगुळ जाली । तर्काचि दृष्टि गेली ।। १६० ।।

यातूनही पांगळा व आंधळा यांचा व्यवहार सूचित होतो. म्हणून येथेही 'समासोक्ती' अलंकार समजावा.

**काव्यलिंग**

ऐसे सेखामृतें धाले । की अमृतभावासि आले
म्हणौनि ब्रह्म ते जाले । अनायासें ।। १५१ ।।

या ओवीत अमृतभावाला येण्याचे कारण अमृत पिऊन समाधान पावणे हे होय. म्हणून येथे 'काव्यलिंग' अलंकार समजावा. तसेच 'अमृत-भावासि' या शब्दावर श्लेष आहे. कारण त्याचे अमृत = मोक्ष, आणि अमृत = एक पेय, असे दोन अर्थ निघतात. शिवाय,

हें असो काये म्हणावें (२१४) या चरणात आक्षेप अलंकार आहे. कारण आपले म्हणणे श्रोत्यांनी लक्षपूर्वक ऐकण्यासाठी स्वतःच खोडून टाकले आहे. याशिवाय परिकर, प्रतिवस्तूपमा, इ. अलंकारांची उदाहरणे देता येतील. वर फक्त ठळक दिसणारे अलंकारच अंतर्भूत केले आहेत.

**शब्दालंकार**

ज्ञानेश्वरांच्या शब्दालंकारांविषयी लिहिल्याशिवाय हे प्रकरण पुरे करता येत नाही. ज्ञानेश्वर जाणूनबुजून शब्दालंकार घडवीत नाहीत हे खरे. परंतु त्यांना नादाचे विलक्षण आकर्षण असल्यामुळे त्यांच्या मुखांतून अनुप्रासादि अलंकार आपोआप बाहेर येतात. यमक हा तर मराठी पद्याचा अपरिहार्य अलंकारच आहे ! उदाहरणादाखल

हा त्रैलोक्यपटाची घडी । आकाराची पैलथडी
आइकैं कैसा ययाचिया आवडी । आवरला असे ।। १४ ।।

एवढें पुरे.

अनुप्रासाचे उदाहरण म्हणून

किं पवनाचेनि कोपें । पाणियेचि जो पलिपे
तो प्रलयानलु काइ दडपे । तृणें नावें ।। १७५ ।।

तैं पापाचा अचलु फीटे । पुण्याची पाहाट फूटे
जैं मूर्ति माझी प्रकटे । पांडुकुमरा ।। ५५ ।।

यांतील प, फ, म, क, न यांचा अनुप्रास आणि

जरि कर्मे करी यज्ञादिकें । ऐसाहि तो कवतिकें

यातील 'क' ची पुनरावृत्ती तसेच,

हारपति आपैसी । उदैलीं सांतीं ।। ११६ ।।

यांतील स्वरांची रेलचेल मनोवेधक नाही असे कोण म्हणेल ?

* *

## ८. चौथ्या अध्यायातील व्याकरणविशेष

ज्ञानेश्वरी हा मराठीतील जवळजवळ पहिला ग्रंथ. आज त्याला सुमारे ७०० वर्षे झाली. त्यामुळे त्याकाळच्या भाषेत व आजच्या भाषेत व्याकरणदृष्ट्या काहीसा फरक आहे. पुढे चवथ्या अध्यायातील काही व्याकरणविशेष दिले आहेत. या विशेषांचे यथावत् ग्रहण केल्यास व्याकरण-मुखाने ज्ञानेश्वरकालीन भाषासागरात सुलभतेने प्रवेश होऊ शकेल.

### वर्णप्रक्रिया

संस्कृतातील अनेक शब्दांवर निरनिराळ्या तऱ्हेचे संस्कार होऊन ज्ञानेश्वरकालीन मराठीत तद्भव शब्द बनताना होणारी प्रक्रिया पुढे ठोकळ मानाने दिली आहे.

१ **वर्णागम**—प्रतिरूपले ( व्यंजनागम );
तत्क्षणीं ( स्वरागम )

२ **वर्णविपर्यय**—अवघे–आघवे; कवडसा-कडवसा; थोडका-थोकडा इ.

३ **वर्णनाश**—उपरि–वरि; स्तोक–थोडकें.

४ **वर्णविकृति**—ग्राम–गांव ‘ म ’ बद्दल ‘ व ’

| | |
|---|---|
| गोष्टी–गोठी<br>अष्ट–आठ | ‘ ष्ट ’ बद्दल ‘ ठ ’ |
| प्रभात–पाहालें<br>बधिर–बहिरा | भ, ध, घ, बद्दल<br>‘ ह ’ |
| स्थान–ठाण<br>स्फुट–फूड | आरंभी ‘ स् ’<br>‘ श् ’ चा लोप |
| अद्य–आज<br>कार्य–काज | य बद्दल ज |

क्षपणक–खवणा | क्ष बद्दल ख

| | |
|---|---|
| सांग–सांघें<br>एकीवेळा–एकीहेला<br>ये वेळी–एऱ्हलि<br>नवलाई–नऱ्हाळी | ज्ञानेश्वरीत हकारप्राबल्य दिसून येते. |

## शब्दरूपे

| विभक्ति | प्रत्यय, अव्यय | रूपे |
|---|---|---|
| प्रथमा | उ, ओ | अर्जुनु, वैवस्वतु ४०, अजु ४१, संशयो ६४, ज्ञानदेवो (३७) २२२. |
| द्वितीया | आ, आं, सि, एं. प्रति | येशा ९, आपणपें ९५, नावे ९६, आपणपां ९७, बुद्धिसि ११८, अविवेककुमारत्वा १२१, आत्मसुख १२३, इंद्रिया २२१. |
| तृतीया | प्रत्ययविरहित रूपेही आहेत. शब्दाच्या अन्त्यस्वराचे दीर्घीकरण. शिवाय एं, सीं, वरी, करवि इ. | अजाणें ५७, दैवगुणें ९, अतिप्रीति ७, आवडी १४, मनू१७, भ्रांति-बुद्धी ४५, उपेगेंसीं ८९, बोलवरी ११२. |
| चतुर्थी | प्रत्ययविरहित, शब्दाच्या अन्त्यस्वराचे दीर्घीकरण. तें, लागि, प्रति इ. | रायातें ७, व्यक्ती ११, कर्तव्यतेलागि ९३, ऐक्यातें ११७. |
| पंचमी | औनि, हूनि | जन्मौनि ३३, संशयाहूनि २०१. |
| षष्ठी | चां, ची, चें, की | दिवसांची १४, मागीलकी ३६, पुरुषाचां १०२. |
| सप्तमी | ई, माजि, इ० | त्रिभुवनीं १३८, गगनामाजि १७४ |

**काही विशेष पद्धतीची नामे**-- जवलिक ८, आगलीक ४, ( ईक प्रत्यय); ज्ञानिया, संशैया २००, सुखिया १८६ ( मूळ इन् प्रत्ययान्त

नामे); नैष्कर्म्यता ८६, कर्तव्यता ९३ (प्रत्ययाची द्विरुक्ती) अशी भाववाचक नामे आढळतात.

**विशेषण**--यांना कधीकधी विशेष्याच्या विभक्तीचे प्रत्यय लागतात. समस्तें कर्मैं ८१, परब्रह्माचेनि कसें ११४, इ. त्याची उदाहरणे होत. तसेंच स्त्रीलिंगी सर्वनामात्मक विशेषण ईकारान्त नसून एकारान्त असते. उदा० हे विनती २१४, हे रेखा २१५, जे गंगा ४.

**सति सप्तमी**—सारखी रचनाही कधी कधी दिसते. उदा. उदैलीं सांतीं ११६.

## क्रियापदें

**वर्तमानकाळ**--वीजे १२३. म्हणपती १३९, घडे १४१, पुरे-सरे-आसरे १४८, स्मरे ४२, सेविती १५०, आह्यासि १७०.

**भूतकाळ**--आजच्याप्रमाणेच तोषला, जाला अशी रूपे आढळतात.

**भविष्यकाळ**--सांवैन १२४, अभिनवैल २११, परिसें ३९, पुसेन ३४.

**आज्ञार्थ**—अवधारीं १२४, पाईं ३६, आईकैं २०८, देखैं १४३, ओलख ७१.

**विध्यर्थ**—देयावें २१४, जाणावें ५५, भजावें १६३, उपमिजे १८१.

**'ज' कर्मणि**--संस्कृतमध्ये कर्मणिप्रयोगासाठी 'य' वापरतात आणि संस्कृतातील 'य' चा ज्ञानेश्वरकालीन मराठीत 'ज' होतो. उदा. नेणिजे ३८, साहिजे ३४, अंगिकारिजे १९६, आईकिजे ३७ इ.

याशिवाय 'प' कर्मणिही आढळतो. उदा. म्हणपति १३९.

**नकारार्थ धातू**—ज्ञानेश्वरांची नकारार्थक क्रियापदे बनविण्याची हातोटी कही वेगळाच आहे. उदा. नेदखे ८ (न देखे) नेणती २४, संचरेना १०२, नाडले १२.

**नामधातू, विशेषणधातू**--हे ज्ञानेश्वरीत वैपुल्याने आढळतात. उदा. निरुपली १६, विस्तारिली १७, मोहलले ८७, बोधला ९३, अभिनवैल २११, कामिजे १२३ इ.

### अव्यये

नीकें, कीर, होकाज ( जणू काही ), जें (कारण), नावा नावा (पुनः पुनः), म्हणौनि, किं ( किंवा ), तरि, परौते, चि ( च ) ही ( हि ) ही अव्यये ज्ञानेश्वरकालीन भाषेंत आढळतात.

* *

## ९. कठीण शब्दांचे व्युत्पत्तींसह अर्थ

(प्रारंभी दिलेले आकडे ओव्यांचे दर्शक आहेत)

( २ ) **परिसणें**–(परिश्रवण) ऐकणे.

( ४ ) **आगलीक**–(अलग + ईक ) निराळेपणा.

( ८ ) **आथि**–(अस्ति) आहे.

( ९ ) **किर, कीर**–( किल, खलु ) खरोखर.

( ९ ) **बहुवसा**–(बहुवशात् ) बाहुल्याने.

(११) **एकवंकी**–(वंकी–चौकीवर राहाणारा ) एकाच वेळी असलेले, एकरूप.

(२०) **आवडे**–आज फक्त रुचणे (to like) असाच अर्थ. ज्ञानेश्वरकाळी 'वाटणे' (to think) असाही अर्थ होत असे.

(२१) **खवणा**–(क्षपणक) जैन साधु.

(२१) **पाटाउवें**–(पट) वस्त्रे (उंची रेशमी).

(२२) **बहिरा** (बधिर).

(२३) **आरौते**–(आरात् ) अलीकडे, नंतर.

(२३) **ओलखणें**–( अवलक्षण ) खूण पटणें.

(२४) **सीवं**–(सीमा) सरहद्द.

(२७) **गुज**–(गुह्य) "अंदरकी बात', रहस्य.

(२७) **पढियंलि**–( प्रिय) आवडता.

(२८) **जावाला**–(जीवालय) जिव्हाळा. (९३)

(२९) **ठाउ॰**–(स्थान) ठिकाण, ठाण.

(३०) **गाजावज्य**–'गजवज्र'पासून भाववाचक नाम. गाजावाजा.

(३३) **पुसणें**–( पृच्छ् ) विचारणें.

( ३५ ) **नावेक**–( नामैक ) क्षणभर.
( ३७ ) **सांपेचा**–( सांप्रत ) अलीकडचा.
( ३७ ) **मातू**–( कानडी शब्द ) गोष्ट.
( ५२ ) **सेंस**–( शीर्ष ) डोके, कपाळ.
( ५९ ) **शोचिती**–( शुच् ) शोक करणे.
( ५९ ) **वचाति**–( व्रज् ) जाणे.
( ७४ ) **पडिसाद**–( प्रतिशब्द ) प्रतिध्वनी.
( ७५ ) **प्रतिस्फल**–( प्रतिफल ) उच्चार सौकर्यासाठी व्यंजनागम.
–त्यासारखे फल मिळणे.
( ७६ ) **सृजिले**–( सृज् ) संस्कृत क्रियापद.
( ७८ ) **विवंचना**–आज ' काळजी ' असा अर्थ. येथे ' विवेचन ' वेगळे करणे.
( ७९ ) **कडसणी**–( कृष् ) घासणे.
( ८४ ) **विचारणें**–विचार करणे ( प्रश्न करणे नव्हे. )
( ८५ ) **कुडें**–( कूट ) खोटे.
( ८६ ) **गिवसणें**–( गवेषण ) सापडणे.
( ९० ) **आपैसें**–( अप्रयास ) आपोआप.
( ९६ ) **रुंख**–( वृक्ष ) हा शब्द कोकणीत प्रचलित आहे.
( ९६ ) **साचोकार**–( सत्याकार ) खरे पाहिले असता.
( ९७ ) **फुडें**–स्फुट ( १९५ ) उघड.
( ९७ ) **वायाणें**– वि+अय् )–व्यर्थ. ( वाया–१८२, २२०. )
(१०६) **गाभार**–( गर्भागार ) अंतर्गृह, माजघर.
(११०) **हान**–( अन्य ) आणि, दुसरा.
(१३१) **काज**–( कार्य ).
(१३२) **रिद्धी**–( ऋद्धि ).
(१३८) **आनानी**–( अन्य + अन्य + स्त्रीलिंगी 'इ' ) वेगवेगळे.
(१४०) **गमिजे**–गत्यर्थक धातु ज्ञानार्थकही असतात.
( गम्–जाणे तसेच वाटणे जाणणे. )
(१४१) **कुवाडें**–( कोकणीत प्रचलित ) कूट, कोडे.

(१४१) **सांकडे**–( संकट ).
(१५०) **सेखामृत**–( शेषामृत ) ( शेष = उरलेले ).
(१५६) **नव्हाली**–( नवल ) अपूर्वत्व.
(१५८) **विसंभति**–( वि + श्रम्भ् ) विसरणे.
(१५९) **लाणि**–( लयन ) मर्यादा.
(१६४) **उल्लगौनि**–( उल्लंघन ) ओलांडणे.
(१६७) **उजीवडें**–( उज्ज्वल किंवा उदयित ) उजेड.
(१६८) **देखणें** ( दृश् )–पाहणे. आज हिंदीत ' देखना ' असे प्रचलित.
(१६९) **पाहिलं–लें**–( प्रभात ) प्रकाश, ज्ञान.
(१७१) **थोकडा**–( स्तोक ) ( २१२. )
(१७१) **चोख–टा**–( चोक्ष (सं.) चोकट कानडी ) चांगला, शुद्ध.
(१७२) **कडवसा**–( कवडसा ) वर्णविपर्यय.
(१७३) **कीडाल**–( किटाल )–गांजणे, व्यर्थ आरोप.
(१७४) **वाहुंटलि**–( वातुल )–वावटळ.
(१७६) **संघडे**–( सम् + घट् ) घडून येणे.
(१९९) **वीरू**–( वैर ? ) प्रतिकूल, वाईट.
(२००) **राति**–( रात्रि ) रात्र.
(२०१) **वागुर**–( वाक् + दोर ) जाळे.
(२०३) **गडद**–( अरबी) अंधार, दाट. ( गर्द–फारशी. )
(२०६) **खत**–( क्षत ) जखम.
(२१०) **ओलावणी**–( आर्द्रयण ) ( ओल्लण–प्राकृत )
(२१०) **आणी**–( अणि ? अयन ? ) बुद्धी.
(२१६) **कोडें**–( कोडु–सिंधी ) कौतुकाने.
(२१८) **नाचवी**–( नृत् ) नाचणे.
(२१९) **मोकलवणें**–( मुक्त ) गुजरातीत प्रचलित.
(२२०) **ओगर**–( कानडी ) भात जेवण. ( आरोगणे-गुजराथीत प्रचलित. )
(२२२) **आराणुक**–( आराम् + णूक ) समाधान.
(२२२) **नीका**–( नेका–अरबी ) चांगले.

## १०. काही वाक्प्रचार

**घर रिघणे**–सुखाच्या इच्छेने दुसऱ्याच्या घरी राहणे. परपुरुषाकडे ठेवलेली म्हणून राहणे.

**शिव देखणे**–हस्तगत करणे.

**भाव जाणणे**–पारंगत होणे.

**गीळूनि घालणे**–नष्ट करणे.

**अवधि तोडणे**–नाहीसे करणे.

**लिहिलें फेडणे**– नष्ट करणे.

**गुढी उभविणे**–आनंद प्रदर्शित करणे, उत्कर्ष करणे.

**सेंस भरणे**–मंगल करणे.

**दोंद होणे**–भरपूर सुख मिळणे.

**पंचत्वीं मिळणे**–( 'पञ्चत्वं गम्' ह्या संस्कृत वाक्प्रचाराचे भाषांतर ) मरणे.

**वाटा वचणे**–मार्गाने जाणे.

**पदर नसणे**–अंतर नसणे.

**कडसणी करणे**–निश्चय लावणे.

**गुंफौनि ठेले**–घोटाळयात पडले.

**कुरवंडी सांडणे**–ओवाळून टाकणे.

**माळ घालणे**–स्वीकारणे, प्राप्त करणे.

**सांघणे**–(५३) हात पाहून सांगणे (भविष्य).

**पांग फिटणे**–हौस पुरी होणे.

**सोस तुटणे**–हाव नाहीशी होणे.

**भटणे**–(१८४) मिळणे (वऱ्हाडी बोलीत प्रचलित).

**वेळु फेडणे**–to kill time व्यर्थ काल घालविणे.

**वास पाहणे**–अपेक्षा करणे.

**मार्ग मोडणे**–नाहीसा होणे.

* *

## ११. अभ्यासोपयोगी संदर्भ-ग्रंथ.

१. श्रीज्ञानेश्वरदर्शन–साहित्यखंड : सं. रा. ब. न. देशमुख.
२. श्रीज्ञानेश्वरी : संपादक–श्री. ग. कृ. आगाशे.
३. सार्थ ज्ञानेश्वरी (प्रस्तावना) : संपादक–प्रा. शं. वा. दांडेकर.
४. ज्ञानेश्वरींतील विदग्ध रसवृत्ति : डॉ. रा. शं. वाळिंबे.
५. गीतारहस्य : लो. बाळ गंगाधर टिळक.
६. मराठीचे साहित्यशास्त्र : डॉ. मा. गो. देशमुख.
७. श्रीज्ञानदेव ( चरित्र ) : प्रो. मा. दा. आळतेकर.
८. श्रीज्ञानेश्वरचरित्र : ह. भ. प. ल. रा. पांगारकर.
९. ज्ञानेश्वरीसर्वस्व : साहित्याचार्य न. चिं. केळकर.
१०. ज्ञानेश्वरांचे तत्त्वज्ञान : डॉ. शं. दा. पेंडसे.



# ज्ञा ने श्व री

## अध्याय चौथा

१. आजि श्रवणेंद्रिया पीकलें । जेणें हें गीतानिधान देखिलें
   आतां स्वप्न चि हें तूकलें । साचासरिसें ।।

२. आदि चि विवेकाची गोठी । वरि प्रतिपदी कृष्णु जगजेठी
   आणि भक्तराजु किरीटी । परिसतसे ।।

१. आज कर्णेंद्रियाला सुकाळ झाला आहे; कारण त्याने आज गीतारूपी ठेवा पाहिला आहे. जे केवळ स्वप्न होते ते आज खऱ्यासारखे झाले आहे.

(तिसऱ्या अध्यायाच्या शेवटी ज्ञानेश्वरांनी "आतां पुनरपि तो अनंतु, आद्य एकी मातु सांगेल" व त्यामुळे रसवृत्तीचा निवाडा होऊन श्रोत्यांना "श्रवणसुखाचा सुकाळु" होईल, असे सांगितले आहे. या संदर्भात आता चवथ्या अध्यायाच्या सुरवातीला ज्ञानेश्वर सांगतात, एखादा द्रव्याचा ठेवा डोळ्यांनी पाहिल्यानंतर त्यांना जसे पारणे फिटले असे वाटते, त्याप्रमाणे आज कानांना गीतारूपी स्वरसंगीत ऐकल्यामुळे कृतार्थ झाल्याचे समाधान झाले आहे. एखादे काल्पनिक स्वप्न साकार व्हावे त्याप्रमाणे कानांनी कल्पिलेले आत्यंतिक सुख प्रत्यक्ष अनुभवास मिळाले आहे.)

२. आधीच अध्यात्मविचाराची गोष्ट; त्यात जगदीश्वर श्रीकृष्ण तिचे प्रतिपादन करणारा आहे आणि भक्तश्रेष्ठ अर्जुन ऐकत आहे.

१. श्रवणेंद्रिये–पंचज्ञानेंद्रियांपैकी एक, कान. पीकलें–सुकाळ झाला, आत्यंतिक सुख झाले. गीतानिधान–गीता या शब्दावर सूक्ष्म कोटी असून संगीतरूपी ठेवा असा अर्थ आहे. स्वप्न तूकलें–कल्पित सुख साक्षात् अनुभवाला आले. साचासरिसें–सत्यसदृश. २. विवेक–आत्मानात्मविचार, अर्थात् अध्यात्मज्ञान. गोठी–गोष्ट, विषय. प्रतिपदी–प्रतिपादन करतो. जगजेठी–जगात ज्येष्ठ, जगदीश्वर. किरीटी–अर्जुनाच्या १२ नावांपैकी एक नाव.

३. जैसा पंचमालापु सुगंधु । किं परिमळु आणि सुस्वादु
भला जाला विनोदु । कथेचा इये ।।

४. कैसी आगलीक दैवांची । जें गंगा जोडली अमृताची
हो काज तपें श्रोतेयांचीं । फला आलीं ।।

(अध्यात्म हा विषयच मुळी श्रेष्ठ दर्जाचा आहे. त्यातून तो श्रीकृष्णासारख्या जगद्विख्यात वक्त्याने सांगितला आहे आणि तशात अर्जुनासारखा भक्तराज श्रोता. अर्थात् हा योग अपूर्व आहे, असा भाव. हाच अर्थ ज्ञानेश्वर आपल्या प्रसिद्ध उपमाशक्तीने पुढील ओवीत स्पष्ट करीत आहेत.)

३. ज्याप्रमाणे पंचम सुस्वराला सुगंध यावा किंवा परिमळाला सुंदर गोड चव यावी, त्याप्रमाणे या कथेचा प्रसंग मोठ्या आनंदाचा झाला आहे.

(कोकिळेचा पंचम स्वर हा मधुर खरा पण त्यालाही सुवासाची जोड मिळाल्यास तो जसा अधिक मधुर होईल किंवा सुगंधाला गोड चवही यावी त्याप्रमाणे या कथेची विशेष गोडी अनुभवण्यास मिळत आहे.)

४. दैवाची अपूर्वता काय वर्णावी ! ही अमृताची गंगाच श्रोत्यांना लाभली आहे. जणू काही त्यांची आजवरची तपेच सुफलित झाली आहेत.

(श्रोत्यांचे भाग्य अशा अपूर्वतेने उदयाला आले आहे की, जणू काही त्यांची पूर्वजन्मात केलेली पुण्याई–तपस्या–आज फळाला आली आहे व त्यांच्यावर अमृताच्या गंगेचा वर्षाव झाला आहे.)

---

३. पंचमालापु-सा, रे, ग, म, प, ध, नि या सप्तस्वरांपैकी ‘ प ’ हा पंचमस्वर अत्यंत कोमल असून कोकिळेच्या ‘ कुहूऽ कुहूऽऽ ’ मधून व्यक्त होतो. विनोदु–(वि + नुद्) विशेष आनंद. आनंदाचा बहर. ४. आगळीक-या शब्दाचा ज्ञानेश्वरकाळी अपूर्वपणा, आगळेपणा, अलौकिकत्व असा अर्थ होता. आज त्याला मर्यादेचे उल्लंघन tresspass असा थोडा निराळा अर्थ आला आहे. अमृताची गंगा–अमृताचा एक थेंबदेखील मिळणे दुर्लभ आणि आज तर अमृताची गंगाच अवतरली आहे. गंगास्नान हे महापुण्य या दृष्टीने अमृताची गंगा असा शब्दप्रयोग केला आहे. जोडणे–या शब्दाचा अर्थ ज्ञानेश्वरकाळी सांधणे असा नसून मिळविणे, प्राप्त होणे असा होता.

५. आतां इंद्रियजात आघवें । तेणें श्रवणाचें घर रिगावें
मग संवादसुख भोगावें । गीताख्य हें ।।

६. हा अतिशयो अतिप्रसंगें । सांडूनि कथा चि ते सांगें
जें कृष्णार्जुन दोघें । बोलत होते ।।

५. आता सर्व इंद्रियांनी कर्णेंद्रियाच्या घरी जावे आणि मग गीता नावाचे हे संभाषणाचे सुख उपभोगावे.

(सर्व इंद्रियांची सुखे ही वेगवेगळी आहेत. परंतु आज श्रवणेंद्रियाचे भाग्य विशेष उदयाला आल्यामुळे सर्व इंद्रियांनी मिळून कानाच्या ठिकाणी केंद्रित व्हावे व शब्दांच्या योगाने स्पर्श, रूप, रस, गंध यांचा अनुभव घ्यावा आणि गीतानामक कृष्णार्जुनाच्या संवादाचा आनंद लुटावा.

येथे चवथ्या अध्यायाची प्रस्तावना संपली. हे प्रास्ताविक ऐकून ज्ञानेश्वरांचे निवृत्तिनाथादिक श्रेष्ठ श्रोते ज्ञानेश्वरांना उद्देशून म्हणतात— )

६. "हा सलगीचा अप्रासंगिक पाल्हाळ सोडून आता श्रीकृष्ण आणि अर्जुन हे दोघे बोलत होते ती कथा तू सांग."

(त्यानंतर ज्ञानेश्वर आता मूळ कथेकडे वळतात—

संजय धृतराष्ट्राला उद्देशून गीतेची कथा सांगत आहे. संजयाच्या भाषणात ज्ञानेश्वरांनी आपल्या प्रतिभेच्या साह्याने ७ ते १५ ह्या ओव्या घातल्या आहेत. नारायणाची म्हणजे श्रीकृष्णाची अर्जुनावर अति प्रीती असण्याचे कारण अर्जुन हा दैवी संपत्तीच्या गुणांनी मंडित झालेला होता. )

५. इंद्रियजात—यच्चयावत् इंद्रिये; जात—समूह; उदा. शब्दजात. आघवें—अवघें, संपूर्ण. घर रिघावें—घर निघणे. ज्ञानेश्वरकाळी 'घर रिघणे' या वाक्प्रचाराचा प्रियकराचे उत्कट सुख मिळावे म्हणून त्याच्या घरी 'रखेली' म्हणून राहणे असा अर्थ होता. तदनुसार इंद्रियांनी आपापले संसार (व्यवहार) सोडून श्रवणाच्या घरी दास्य स्वीकारावे असा भावार्थ. गीताख्य—गीता आहे आख्या (नाव) ज्याची असे. बहुव्रीहि समास. ६. अतिशयो—सलगी, लागटपणा. अतिप्रसंग—मर्यादेचे उल्लंघन. पाल्हाळीक भाषण.

७. तेव्हलि संजयो रायातें म्हणे । अर्जुन् अधिष्ठिला दैवगुणें
जें अतिप्रीती नारायणें । बोलिजत असे ।।

८. देवी लक्ष्मी येतुली जवलिक । परि तेही यया प्रेमाचें
नेदखे चि मुख ।
आजि कृष्णस्नेहाचें पीक । ययातें चि आथि ।।

९. सनकादिकांचेया दुरासा । वाढिनलेया किर बहुवसा
परि तियाही येणें मानें एषा । येती चि ना ।।

७. त्यावेळी संजय धृतराष्ट्राला म्हणाला, "खरोखर भाग्यानेच अर्जुनाचा आश्रय घेतला (असे म्हटले पाहिजे) कारण त्याला उद्देशून प्रत्यक्ष भगवान् श्रीकृष्ण मोठ्या प्रेमाने बोलत होते.

८. विष्णूची पत्नी लक्ष्मी एवढी त्याला जवळची परंतु तिनेही ज्या प्रेमाचे मुख पाहिले नाही त्या कृष्णप्रेमाची बहार केवळ अर्जुनालाच मिळाली आहे.

(साक्षात् पत्नीप्रेमापेक्षाही श्रीकृष्णाचे भक्तप्रेम हे अधिक उत्कट होते. त्यामुळे अध्यात्मज्ञानाचा लक्ष्मीलाही लाभ झाला नाही. परंतु कृष्णस्नेहाच्या सुबत्तेत अर्जुन मात्र भागीदार झाला.)

९. सनक, सनंदन, सनत्कुमार या सुप्रसिद्ध भगवद्भक्तांच्या (परमात्म-सुखाबद्दलच्या) व्यर्थ आशा खरोखर खूपच बळावल्या होत्या. परंतु त्याही अर्जुनाच्या मानाने यशस्वी होऊ शकल्या नाहीत.

---

७. दैवगुणें–दैवी आणि आसुरी अशा दोन संपत्ती गीतेच्या १६ व्या अध्यायात वर्णन केल्या आहेत. त्यांपैकी अर्जुनाजवळ दैवी संपत्तीच्या गुणांचें अधिष्ठान होते. बोलिजत–जुन्या मराठीतील 'ज' हा कर्मणि प्रत्यय. नारायणाकडून अर्जुन बोलला गेला असा अर्थ. ८. येतुली–एवढी. जवळिक–जवळची, प्रेमाची. नेदखे मुख–तोंड पाहत नाही. अर्थात् तिला कृष्णस्नेहाचा अंशदेखील मिळत नाही. 'मुख' ऐवजी 'सुख' असा पाठभेद, पीक–अर्जुनाला मात्र कृष्णस्नेहाची सर्व सुगी मिळते. यालाच ज्ञानेश्वरांनी 'आजि श्रवणेंद्रियां पीकलें' असे म्हटले आहे. आथि–(अस्ति) आहे. ९. दुरासा–दुस्तर, कठीण अशा आशा. किर–खरोखर. बहुवसा–पुष्कळ प्रमाणात. एषा–यशा. सरकारी प्रत 'येषा'.

१०. यया जगदीश्वराचें प्रेम । येथ दीसतसे निरूपम
कैसें पार्थें येणें सर्वोत्तम । पुण्य केलें ।।
११. हो काज येयाचेया प्रीती । हा अमूर्त्तु आला व्यक्ती
मज येकवंकिचिया स्थिती । आवडतसे ।।
१२. यऱ्हींव योगियां नाडळे । वेदार्थासि नाकले
जेथ ध्यानाचे डोले । पावतिना ।।
१३ तें हा स्वरूप । जें अनादि निष्कप
परि कथणें मानें सकृप । जालां असे ।।

(सनत्कुमारादी प्रसिद्ध योगी व भगवद्भक्त होते. दुर्लभ असे ईश्वरप्रेम आम्हांला पूर्णपणे प्राप्त होईल अशी त्यांना आशा होती. परंतु त्यांची आशादेखील अर्जुनाच्या भाग्याच्या तुलनेने पाहता कमी यशस्वी ठरली.)

१०. या जगदीश्वराची प्रीती या ठिकाणी ( अर्जुनाच्या बाबतीत ) अतुल दिसते. या अर्जुनाने केवढे श्रेष्ठ प्रकारचे पुण्य मिळविले आहे !

(श्रीकृष्ण जगन्नायकाने अनेक व्यक्तींवर प्रेम केले; परंतु त्याच्या अर्जुन-विषयक प्रेमाला तुलना नाही. अहो, या अर्जुनाची केवढी थोर पुण्याई म्हटली पाहिजे ! )

११. जणू काही त्याच्या प्रीतीसाठी अमूर्त असलेला तो व्यक्तिरूपाने मूर्त झाला. मला असे वाटते की, या दोघांची स्थिती एकरूप आहे.

(अलौकिक पुण्यवान् अशा अर्जुनाच्या प्रेमानेच जणू काही निराकार परमेश्वराने साकार अवतार धारण केला. किंबहुना श्रीकृष्ण आणि अर्जुन यांचे अस्तित्व एकरूप आहे.)

१२ व १३. तसे पाहिले तर जो योग्यांना सापडत नाही; वेदार्थाला आकलन होत नाही व ज्या ठिकाणी ध्यानाची दृष्टी पोचू शकत नाही,

---

१०. निरुपम–उपमा नाही ज्याला असे (नञ् ब. स. ) ११. हो काज–जणू काही. प्रीती–प्रीतीने; प्रत्ययविरहित तृतीया. हा व्यक्ती आला–साकार झाला. एकवंकी–समरूप, सारखी. आवडतसे–वाटतसे. ज्ञानेश्वरकाळी आवडणे या क्रियापदाचा अर्थ वाटणे असा होता. १२. नाडळे–न आढळे, सापडत नाही. नाकळे–कळत नाही. ध्यानाचे डोळे–ध्यान करणाऱ्याची दृष्टी. १३. स्वरूप–

**१४. हा त्रैलोक्यपटाची घडी । आकाराची पैल थडी**
**आइकें कैसा ययाचिया आवडी । आवरला असे ॥**

श्रीभगवानुवाच ॥

*इमं विवस्वते योगं प्रोक्तवानहमव्ययम् ।*
*विवस्वान् मनवे प्राह मनुरिक्ष्वाकवेऽब्रवीत् ॥१॥*

[ श्रीभगवान् म्हणाले—

योग हा अविनाशी मी स्वये सूर्यास बोलिलो
मनूस बोलिला सूर्य तो इक्ष्वाकूस त्यापरी ]

तो हा आपल्या रूपाने अनादी व निर्विकार असूनही किती प्रमाणात सदय झाला आहे !

(सामान्यतः योग्यांना परमात्मा प्राप्त होत नाही. "यतो वाचो निवर्तन्ते अप्राप्य मनसा सह ।" या वचनाप्रमाणे वेदवाणीला तो कळू शकत नाही. केवळ ध्यानादिकांची दृष्टी त्याच्यापर्यंत पोहचू शकत नाही. असा हा आत्मस्वरूपी अनादी, कंप ( स्फुरण किंवा विकार ) नसलेला केवळ अर्जुनाच्या बाबतीत मात्र कृपावंत झाला. )

१४. हा श्रीकृष्ण त्रैलोक्यरूपी वस्त्राची जणू काही घडीच आहे. हा आकारादी विकारांच्या पलीकडचा आहे. परंतु अर्जुनाच्या प्रेमामुळे तो त्याच्या कसा आटोक्यात आला आहे ते तू आता ऐक.

(स्वर्ग, मृत्यु, पाताळ हे तिन्ही लोक याच्या उदरात वास करतात. आणि तो निराकार असूनही अर्जुनाच्या प्रेमाने ज्याला कसे साकार केले आहे त्याचे भाषण तू ऐक, असे संजय धृतराष्ट्राला म्हणाला. )

---

आत्मरूप. निष्कंप–निर्विकार. कवणें मानें–किती मोठ्या प्रमाणात. सकृप–कृपा प्रसाद देणारा. सरकारी प्रत 'जालें.' १४. त्रैलोक्यपटाची घडी-तिन्ही लोक अर्थात् ब्रह्मांड संपुष्टात ठेवणारा. पैलथडी–पलीकडील तट, परतीर; अर्थात् अतीत. आवडी–प्रेमाने, आवरला असे–आहारी आणला आहे, आटोपशीर केला आहे.

१५. मग म्हणे पांडुसुता । हा चि योगु आह्मीं विवस्वता
कथिला परि ते वार्त्ता । बहुतां दिसांची ।।

१६. मग तेणें विवस्वतें रवी । हेचि योगस्थिति आघवी
निरोपिली बरवी । मनूप्रति ।।

१७. मनू आपण अनुष्ठिली । मग इक्ष्वाकूंसि उपदेशिली
ऐसी परंपरा विस्तारली । आद्य हे ।।

*एवं परंपराप्राप्तमिमं राजर्षयो विदुः ।*
*स कालेनेह महता योगो नष्टः परंतप ॥ २ ॥*

[ अशा परंपरेतूनि हा राजर्षींस लाभला
पुढें काळ-बळाने तो ह्या लोकी योग लोपला ]

१८. मग आणिक ही या योगातें । राजरुषी जाले जाणते
परि तेथौनि आतां सांप्रतें । नेणिजे हा ।।

१९. जें प्राणियां कामीं भरु । देहाचि वरि आदरु
बहुत करूनि विसरू । आत्महिताचा ।।

**१५** ते १७. मग भगवान् श्रीकृष्ण अर्जुनाला म्हणाले, " आम्ही हाच योग (निष्कामकर्मयोग) सूर्याला सांगितला होता. परंतु ती गोष्ट आता फार दिवसांची झाली. मग त्या विवस्वान् रवीने ही सर्व योगस्थिती मनूला समजावून सांगितली तिचे मनूने अनुष्ठान करून तिचा उपदेश इक्ष्वाकूला दिला. याप्रमाणे योगाच्या पूर्वपरंपरेचा विस्तार आहे.

१८. तदनंतर अनेक राजर्षींना योगज्ञान झाले. परंतु तेव्हापासून आजपर्यंत या योगाला जाणणारा कोणी दिसत नाही.

(गीतेच्या काळात योगमार्गाचे ज्ञान दुर्लभ झाले आहे.)

**१९.** याचे कारण असे की, मनुष्यप्राणी वासनांना बळी पडले. देहावरच निष्ठा ठेवणारे झाले. म्हणूनच बहुतकरून त्यांना आत्मज्ञानाचा विसर पडला.

---

१८. राजरुषी—ऋषींमधील श्रेष्ठ. १९. जें—कारण की, भरु—उत्कर्ष. आदरु—निष्ठा.

२०. अविट नाथिली आस्थाबुद्धि । विषयसुख चि परमावधी
जीउ तैसा उपाधि । आवडे लोकां ॥

२१ यऱ्हवि तऱ्ही खवणेयाचां गावीं । पाटाउवें काइ करावीं
सांघें जात्यंधा रवि । काजा आथि ॥

२२. कां बहिरांचिये आस्थानीं । कव्हणीं गीतातें हानमानी
कीं कोल्हेयां चंदनीं । आवडि उपजे ॥

२३. पैं चंद्रोदया आरौते । जेयांचे डोले फूटति असते
ते काउले केवि चंद्रातें । उऴखति ॥

आत्मा हा इंद्रिय, विषय व देहबुद्धी यांच्या पलीकडचा असल्यामुळे इंद्रियलोलुप व देहासक्त लोकांना आत्म्याची स्मृती राहत नाही.

२०. आत्मविषयक आस्थाबुद्धी ठाम नसली म्हणजे विषयांचे सुख हेच सर्वश्रेष्ठ वाटते. आणि संसाराची उपाधी हीच जीवासारखी प्रिय वाटते.

(आत्मनिष्ठा जर मनात कायमची बिंबली नसेल तर इंद्रियविषयाचे सुख हेच सर्वस्व वाटते आणि वस्तुतः नाशवंत असलेला उपाधिरूप संसार लोकांना जीवाहून प्रिय वाटतो.)

२१ ते २३. तसे पाहिले तर दिगंबर क्षपणकांच्या गावात कपड्या-लत्त्यांचे काय काम ? जन्मांधाला सूर्याचा काय उपयोग आहे, तो सांग बरे ! ज्याप्रमाणे बहिऱ्यांच्या सभेत गायनाला काही मान नसतो, किंवा कोल्ह्यांना कधी चंदनाविषयी प्रेम (ओढ) निर्माण होत नाही, तसेच चंद्रोदयापूर्वी ज्यांच्या डोळ्यांना दिसू शकत नाही असे कावळे चंद्राला कसे ओळखणार बरे ?

(खवणे म्हणजे नग्न राहणारे जैन साधू. त्यांच्या गावात महावस्त्रांचे काही काम नसते. बहिऱ्यांना गायन, कोल्ह्यांना चंदन किंवा रात-आंधळे असलेल्या कावळ्यांना चंद्रप्रकाश त्याप्रमाणे मोहग्रस्त लोकांना योगप्राप्ती नाही असा भावार्थ.)

२०. अविट–न विटणारी, पक्की, ठाम. नाथिली–नसली. आस्थाबुद्धी–आत्मनिष्ठेची भावना. 'अव्हाटलिया आस्थाबुद्धि' असा पाठभेद. उपाधि–संसाराची घडामोड. जीउ तैसा–प्राणासारखी. २१ ते २३. खवणे–क्षपणक

२४. तैसो वैराग्याची सोवं नेदखति । जे विवेकाची भाष नेणति
ते मूर्ख केवि पावती । ईश्वरातें ।।

२५. कैसा नेणों मोहो वाढीनला । तेणें बहुते येकु वेलु गेला
ह्मणौनि योगु हा लोपला । लोकीं इये ।।

*स एवायं मया तेऽद्य योगः प्रोक्तः पुरातनः ।*
*भक्तोऽसि मे सखा चेति रहस्यं ह्येतदुत्तमम् ॥ ३ ॥*

[ तो चि हा बोलिलो आज तुज योग पुरातन
जीवींचे गूज हे थोर तू हि भक्त सखा तसा ]

२४. त्याप्रमाणे ज्यांनी वैराग्यरूपी (नगराची) शीव पाहिली नाही, ज्यांना विवेक कशाला म्हणतात हे माहीत नाही असे मूर्ख पुरुष ईश्वर-स्वरूपाला कसे पोहचणार ?

(आधी वैराग्य, नंतर आत्मज्ञान व शेवटी ईश्वरप्राप्ती असा क्रम असल्या-मुळे जे विरक्त नाहीत व ज्यांना विवेक हा शब्दही माहीत नाही ते इंद्रिय-लोलुप मूर्ख ईश्वराची प्राप्ती करू शकत नाहीत.)

२५. हा मोह इतका कसा पसरला आहे कोण जाणे! पण या मोहामुळे पुष्कळ काळ वाया गेला. म्हणून या लोकात कर्मयोगाचा लोप झाला.

( मोह म्हणजे अज्ञान. ते वाढीला लागले म्हणजे त्यात बहुत कालक्रमणा होते आणि योगमार्ग नाहीसा होतो. )

---

दिगंबर-पंथीय नग्न जैनसाधु. पाटाउवें–महावस्त्र. काजा आथी–काय उपयोग. जात्यधा–जन्मापासून आंधळे असलेल्यांना. आस्थान–सभा, घर. आरौते–पूर्वी. डोळे फूटति असते–दिसत नाही. २४. सीव नेदखती–गावाची सीमा पाहू शकत नाहीत. अर्थात् विरक्ती त्यांच्या गावीही नाही. विवेकाची भाषा–ज्ञानाची ओळख. २५. मोह–इंद्रियबुद्धीमुळे निर्माण होणारे अज्ञान. इये लोकीं–सांप्रतच्या जगात.

२६. तो चि हा आजि आतां । तुजप्रती कुंतीसुता
सांघितला आह्मीं तत्वता । भ्रांति न करीं ।।
२७. हें जीविचें गा गुज । परि न ऱ्हाइजे चि तूज
जें पढियंसि तूं मज । ह्मणौनियां ।।
२८. तूं प्रेमाचा पूतला । भक्तिचा जीवाला
मैत्रियेची कला । धनुर्द्धरा ।।
२९. तूं अनुसंगाचा ठाउ । आतां तुज काइ राहों
जऱ्हीं संग्रामारूढ आहों । जालों आह्मीं ।।
३०. तऱ्हीं नावेक हें साहावें । गाजाबज्य ही धरावें ।
परि तूझें अज्ञानतत्व हरावें । लागे आदीं ।।

२६. अर्जुना, खरोखर तोच (कर्मयोग) आज आम्ही तुला सांगितला आहे. आता तू भ्रमात सापडू नकोस.

२७. (वास्तविक पाहतां) हे (कर्मयोगाचे तत्त्व) मनातले गुप्त रहस्य आहे. परंतु ते तुझ्यापासून मी गुप्त कसे ठेवू? कारण तू माझा फार आवडता आहेस.

२८. हे अर्जुना, तू मूर्तिमंत प्रेम आहेस, भक्तीचा जिव्हाळा आहेस, आणि साक्षात् स्नेहाचाच अंश आहेस.

२९. तू भक्ताच्या जागी आहेस. (तुझे भक्ताचे नाते असल्यामुळे) तुझ्यापासून काय लपवून ठेवावे? जरी आम्ही सध्या युद्धास उभे राहिलो आहो,—

३०. तरी क्षणभर हे बाजूला राहू द्यावे लागते, गलबलाही थांपून धरावा लागतो. आणि तुझा अज्ञानीपणा अगोदर दूर करावा लागतो.

---

२६. तत्त्वता–तात्त्विक दृष्टीने, खरोखर. भ्रांति–मोह. २७. पढियंसि–पढियंता·लाडका, आवडता. जें–कारण की. २८. जीवाला–(जीवालय या संस्कृत शब्दापासून) जिव्हाळा, सर्वस्व. इतर प्रतीत 'मैत्रियेची चित्कळा' असा पाठ आहे. रूपक अलंकार. २९. अनुसंग (अनुषंग–सं.)–अनुयायी, भक्त. ठाउ–(स्थान·ठाण) ठिकाण. संग्रामारूढ–युद्धास सिद्ध ३०. साहावे–सहन करावे, थांबावे. नावेक–क्षणभर. गाजाबज्य–गडबड, गलबला.

**अर्जुन उवाच ॥**

*अपरं भवतो जन्म परं जन्म विवस्वतः ।*
*कथमेतद्विजानीयां त्वमादौ प्रोक्तवानिति ॥ ४ ॥*

[ अर्जुन म्हणाला-

ह्या काळचा तुझा जन्म सूर्याचा तो पुरातन
तू बोलिलास आरंभी हे मी जाणू कसे बरे ]

**३१. तवं अर्जुनु ह्मणे हरी । माये आपुलेयाचा स्नेह करी**
**एथ विस्मयो काइ अवधारीं । कृपानिधी ।।**

**३२. तूं सवंसारश्रांताची साउली । अनाथांची माउली**
**आमतें किर प्रसवली । तूझी चि कृपा ।।**

**३३. देवा पांगूळ एकाधें वीजे । तरि जन्मौनि जोजारु साहिजे**
**हें बोलों काइ तूझें । तुज चि पुढां ॥**

३१. तेव्हा अर्जुन म्हणाला "हे श्रीकृष्णा, आई आपल्या मुलावर प्रेम करते यात काय आश्चर्य ? हे कृपासागरा, असे पाहा की,—

३२. तू संसारात दमल्या भागल्यांची सावली आहेस आणि अनाथांची माउली आहेस. तुझ्या कृपेनेच खरोखर आम्ही जन्माला आलों आहों.

३३. श्रीकृष्णा, एखादा पांगळा मुलगा जन्माला आला तर त्याच्या जन्मापासूनच त्याच्या खस्ता खाव्या लागतात. (पण) हे तुझे (थोरपण) तुझ्याच पुढे काय वर्णावे ?

---

पाहा—गजबज बहु झाली । माय धावोनि आली-रघुनाथपंडित, नलदम. आदि—अगोदर, आधी. धरावें-थांबवावे. 'गाजाबाज्यहि न धरावे' असा पाठभेद.

३१. आपुला—स्वकीय, पुत्र. ३२. सवंसारश्रान्त-संसारतापामुळे दमलेला. साउली छाया या सं. शब्दापासून. किर—(खलु किंवा किल या सं. शब्दापासून) खरोखर. ३३. पांगुळ—( पङ्गु + ल) लंगडा लहान मुलगा. एकाधें-एखादे. विजे (विणें)—जन्म पावणे. जन्मास येते. जन्मौनि—जन्मापासून. औनि—हा जुन्या मराटीतील पंचमीचा प्रत्यय. जोजार-(जोजवार) फटकट, कष्ट.

३४. आतां पुसैन जें मीं काहीं । तेथ नीकें चित्त देईं
तेविं चि देवें कोपावें नाहीं । बोला एका ।।

३५. तरि मागीलकी जे वार्त्ता । तुवां सांघितली होती अनंता
ते नावेक मज चित्ता । येचि ना ।।

३६. जें तो विवस्वतु ह्मणिजे काइ । ऐसें हें वडिलां हीं ठाउवें नाहीं
तरि तुवां चि केविं पाईं । उपदेशिला ।।

३७. तो आइकिजे बहुतां काळांचा । आणि तूं तव कृष्णा सांपेचा
ह्मणोनि गा इये मातूचा । विसंवादु ।।

३८. तेविं चि चरित्र देवा तुझें । आपण काहीं नेणिजे
हें लटिकें केविं ह्मणिजे । येकी हेलां ।।

३४. आता मी जे काही तुला विचारीन तेथे नीट लक्ष दे. तसेच, देवाने माझ्या एका बोलण्याचा राग धरू नये.

३५. हे श्रीकृष्णा, तू मागे मला जी पूर्वीची हकीकत सांगितली होतीस ती माझ्या मनाला क्षणभर देखील पटत नाही.

३६. कारण की, तो विवस्वान् म्हणजे कोण ?–हे आमच्या वाड-वडिलांनाही माहीत नाही. मग तूच त्याला उपदेश कसा केला असेल सांग बरे !

३७. तो फार काळापूर्वीचा म्हणून ऐकिवात आहे आणि कृष्णा, तू तर अलीकडचा आहेस. म्हणून या गोष्टीत ( मला ) विसंगती दिसते.

३८. तसेच, श्रीकृष्णा तुझे पूर्वचरित्रही आम्हाला काही माहीत नाही. मग हे खोटे आहे असे एकाएकी ( सहजासहजी) कसे म्हणावे ?

---

३४. पुसैन–( पृच्छ्–सं. प्रश्न करणे ) विचारीन. ३५. मागीलकी–आधीची, पूर्वीची. ३६. विवस्वतु–( विवस्वान् ) अनादी सूर्य. ठाउवे–( स्था सं. धातू ) माहितीचे, ठाऊक असलेले. पाईं–पाही, पाहा बरे. उपदेशिला-नामधातु ३७ सांपेचा–सांप्रतचा. मातु–( कानडी शब्द ) गोष्ट, बाब ३८. चरित्र–ईश्वराच्या पूर्वीच्या लीला. हेलां–(संस्कृत। लीलेने. सहज.

३९. परि हे चि मातु आघवी । मी परिसें तैसो सांघावी
जें तुवां चि तेया रवी । उपदेशु केला ॥

श्रीभगवानुवाच ॥

*बहूनि मे व्यतीतानि जन्मानि तव चार्जुन ।*
*तान्यहं वेद सर्वाणि न त्वं वेत्थ परंतप ॥ ५ ॥*

[ श्रीभगवान् म्हणाले—
माझे अनेक ह्यापूर्वी झाले जन्म तसे तुझे
जाणतो सगळे मी ते अर्जुना तू न जाणसी ]

४०. तवं कृष्णु ह्मणे पांडुसुना । तो वैवस्वतु जैं होंता
तैं आह्मी नसों ऐसी चित्ता । प्रतीति तुज ॥

४१. तरि तूं गा हें नेणसी । पैं जन्में आह्मां तुह्मांसि
बहुतें गेलीं परि न स्मरसी । आपुलीं तूं ॥

४२. मी जेणें जेणें अवसरें । जें जें होउनि अवतरें
तें समस्त हीं स्मरें । धनुर्द्धरा ॥

३९. यासाठी तू त्या सूर्याला उपदेश केला ही संपूर्ण कथा मला पटेल अशा रीतीने सांगावी. ”

४०. तेव्हा श्रीकृष्ण म्हणाला की, अर्जुना, जेव्हा तो विवस्वान् होऊन गेला तेव्हा आम्ही नव्हतो, अशी तुझ्या मनाची खात्री पटलेली दिसते.

४१. त्याअर्थी तुला ते काही ठाऊक नाही हेच खरे. अरे, तुमचे आमचे पुष्कळ जन्म होऊन गेले परंतु तुझ्या जन्माची तुला आठवण नाही.

४२. मी ज्या ज्या वेळी, जे जे अवतार धारण केले, त्या त्या सर्वांची, हे अर्जुना, मला (चांगली) आठवण आहे.

---

३९. आघवी-अवघी, संपूर्ण. परिसें-(परिश्रु)-ऐकणे-पटणे, समजणे.

४१. पैं-खरोखर. जन्म हा शब्द संस्कृतातल्याप्रमाणे नपुंसकलिंगी वापरला आहे. ४३. अजुही-अजन्मा असूनही. संभवें-जन्म घेतों. अवतार घेतों. प्रकृति-सांख्यमताप्रमाणे प्रकृती हे जडतत्त्व आहे. तिलाच माया म्हणतात. प्रकृती अर्थात् माया पुरुषाला अर्थात् परमेश्वराला जन्म घ्यावयास लावते. म्हणून मायेच्या प्रेरणेने असा अर्थ.

४३. **म्हणौनि हें आघवें । मागील मज आठवे**
**मी अजुही परि संभवें । प्रकृतियोगें ।।**

*अजोऽपि सन्नव्ययात्मा भूतानामीश्वरोऽपि सन्*
*प्रकृतिं स्वामधिष्ठाय संभवाम्यात्ममायया ॥ ६ ॥*

[ असूनि हि अजन्मा मी निर्विकार जगत् प्रभु
माझी प्रकृति वेढूनि मायेने जन्मतो जणू ]

४४. **माझें अव्यक्तत्व न नशें । परि होणें जाणें एक दीसे**
**तें प्रतिबिंबे मायावशें । स्वस्वरूपीं ।।**

४५. **माझी स्वतंत्रता न मोडे । परि कर्माधीनु ऐसा आवडे**
**तें हीं भ्रांतिबुद्धी तरि घडे । यऱ्हवीं नाहिं ।।**

४३. म्हणून मला माझ्या पूर्वजन्मांतील सर्व गोष्टींचे स्मरण आहे. मी अज ( न जन्मणारा ) असून मायेच्या योगाने जन्म घेतच असतो.

४४. वस्तुतः माझा अव्यक्तपणा (निराकारत्व) नाश पावत नाही. परंतु माझे अवतार घेणे आणि संपविणे एवढेच फक्त दिसते. आणि मायेच्या योगामुळे माझ्या आत्मस्वरूपात त्याचे (माझ्या होण्याजाण्याचे) प्रतिबिंब दिसते. (वस्तुतः मी जन्मतही नाही आणि नाहीसाही होत नाही. तो केवळ आभास होय. )

४५. ( असे असले तरी ) माझ्या स्वतंत्रपणाला बाधा येत नाही. परंतु मी कर्माधीन आहे असे लोकांना वाटते. हे वाटणेही अज्ञानामुळेच होय, इतर कारणाने नव्हे.

---

४४. अव्यक्तत्व-अमूर्तत्व, निराकरत्व. 'अव्ययत्व' असा पाठभेद आहे. होणें जाणें-आस्तित्वात येणे आणि लोप पावणे. प्रतिबिंब-आभास. मायावश-परमेश्वराचे साकार होणे हे मायेच्या अधीन आहे, म्हणून मायेच्या योगाने. स्वस्वरूप – आत्म्याच्या रूपात. ४५. स्वतंत्रता-आत्मस्वरूप निरुपाधिक असल्यामुळे ते स्वतंत्र आहे. न मोडे-उणेपणा न येणे. कर्माधीन-पूर्वजन्म-परंपरेनुसार अवतरलेला. आवडे-यादवकाळात आवडणे शब्दाचा अर्थ वाटणे असा होता. भ्रांतिबुद्धी-भ्रममूलक ज्ञानामुळे.

४६. जें येक चि दीसे दुसरें । तें दर्पणाचेनि आधारें
यऱ्हवीं काइ वस्तुविचारें । दूजें आहे ॥

४७. तैसा अमूर्तु चि मीं किरीटी । परि प्रकृतितें जें अधिष्ठीं
तें साकारपण नटीं । काचा येया ॥

*यदा यदा हि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत ।*
*अभ्युत्थानमधर्मस्य तदात्मानं सृजाम्यहम् ॥ ७ ॥*

[ गळूनि जातसे धर्म ज्या ज्या वेळेस अर्जुना
अधर्म उठतो भारी तेव्हा मी जन्म घेतसे ]

४८. जें धर्मजात आघवें । युगीं युगिं मियां चि रक्षावें
ऐसा ओघु हा स्वभावें । आद्यु असे ॥

४९. म्हणौनि अजत्व परौतें ठेवीं । मीं अव्यक्तपण ह्रीं नाठवि
जेव्हलि धर्मातें अभिभवी । अधर्मु हा ॥

४६. केवळ आरशाऱ्याच आधाराने एकच वस्तू दुहेरी दिसते. परन्ही केवळ वस्तूचाच विचार केला असताना त्या दोन आहेत का ?

४७. त्याप्रमाणेच हे अर्जुना, मीही निराकारच आहे. परंतु मी जेव्हा मायेचा आश्रय घेतो तेव्हा उपयोगी पडण्यासाठी साकार होऊन भासमान होतो.

४८. जेवढा जेवढा म्हणून धर्म आहे तेवढ्या सर्वांचे मीच प्रत्येक युगात रक्षण करावे असा मुळापासूनचा स्वाभाविकच क्रम आहे.

४९. म्हणून ज्यावेळी अधर्म हा धर्मावर पगडा बसवितो त्यावेळी मी जन्मरहितत्व बाजूला ठेवतो आणि मी आपले निराकारपणही विसरतो;

---

४६. दुसरें–प्रतिबिंब. ४७. अमूर्त–अव्यक्त, निराकार. आधिष्ठीं–आधिष्ठान, आधार, आश्रय घेतो. नटीं–नटतों. नटाप्रमाणे कृत्रिम रूप घेऊन वावरतो. काजा येया–विशिष्ट कार्याला उपयोगी पडण्यासाठी. काज–कार्य सं.

४८. धर्मजात–सर्वप्रकारचा धर्म. ओघ–क्रम. ४९. अजत्व–जन्माला न येण्याचा धर्म. परौते–पलीकडे. अभिभवी–हल्ला करतो, कुरघोडी करतो.

५०. तेव्हलि आपुलेयाचेनि कैवारें । मी साकारु होउनि अवतरें
मग अज्ञानाचें आंधारें । गीळूनि घाली ।।

*परित्राणाय साधूनां विनाशाय च दुष्कृताम् ।*
*धर्मसंस्थापनार्थाय संभवामि युगे युगे ॥ ८ ॥*

[ राखावया जगी संतां दुष्टां दूर करावया
स्थापावया पुन्हा धर्म जन्मतो मी युगी युगी ]

५१. अधर्माची अवधि तोडीं । दोषांचें लिहिलें फेडीं
सज्जनाकरवि गुढी । उभवीं मीं ।।

५२. दैत्यांचीं कुळें नाशीं । साधूंचा मानु गिवसीं
धर्मासि नीतीसीं । सेस भरीं ।।

५३. मी अविवेकाची काजळी । फेडूनि विवेकदीपु उजळीं
तैं योगियां पाहे दिवाळी । निरंतर ।।

५०. तसेच स्वकीयांची ( भक्तांची ) बाजू घेऊन मी देहरूपाने अवतार घेतो आणि मग अज्ञानरूपी अंधकारास गिळून टाकतो.

५१. मी अधर्माला वाव देत नाही, दोषाचे नाव नाहीसे करतो ( आणि) साधुपुरुषांच्या हातून धर्माची पताका फडकवितो.

५२. दैत्यांचा कुलक्षय करतो; साधूंची प्रतिष्ठा प्रस्थापित करतो; धर्माची आणि नीतीची गौरवपूर्वक संस्थापना करतो.

५३. मी अज्ञानाची काजळी झटकून ज्ञानरूपी दिवा प्रज्वलित करतो आणि अशा रीतीने योग्यांना सतत (ज्ञानाचा ) प्रकाश दिसतो. (योगी आणि लोक कायमचे विवेकाच्या वातावरणात राहतात.)

५०. कैवार—पक्षपात. आंधारें—अंधार हा शब्द एकारान्त नपुंसकलिंगी वापरला आहे. गीळूनि घाली—गिळून टाकतो, नाहीसा करतो. ५१. अवधि तोडी—सत्ता नाहीशी करतो, सीमा मोडून टाकतो. लिहिलें फेडीं—लिहिलेले ( भविष्य ) पुसून टाकतो. गुडी उभविणे—( गुडि—कानडी—निशाण ) यश वाढविणें, जयजयकार करविणे. ५२. मान गिवसीं—प्रतिष्ठा प्रस्थापित करतो. सेस भरणे—( सेस—शीर्ष ) मळवट भरणे, गौरव करणे. ५३. काजळी फेडी—कलंक नाहीसा करतो. अज्ञानावर अंधाराचे आणि ज्ञानावर दीपाचे रूपक प्रसिद्धच आहे.

५४. स्वसुखें विश्व कोंदे । धर्मांचें जगीं नांदे
भक्तांसि होंति दोंदें । सात्विकाचीं ।।

५५. तें पापाचा अचलु फीटे । पुण्याची पाहाट फूटे
जें मूर्ति माझी प्रकटे । पांडुकुमरा ।।

५६. येयां ऐसेयां काजालागि । अवतरिजें गा युगीं युगीं
परि हें चि वोलखे जो जगीं । तो विवेकिया ।।

*जन्मकर्मच मे दिव्यमेवं यो वेत्ति तत्वत:*
*त्यक्त्वा देहं पुनर्जन्म नैति मामेति सोऽर्जुन ॥ ९ ॥*

[ जन्म-कर्मे अशी दिव्य जो माझी नीट ओळखे
देह गेल्या पुन्हा जन्म न पावे भेटुनी मज ]

५४. आत्मानंदाने सर्व विश्व खचून भरते; धर्म जगात सुखाने वावरतो आणि भक्तांना अष्टसात्त्विक भावांची दोंदे निघतात. ( आत्मसुख आणि धर्म यांमुळे भक्त सुखी होतात. )

५५. अर्जुना, ज्यावेळी मी साकार होऊन अवतार धारण करतो, त्यावेळी पापांचे पर्वत नाहीसे होतात आणि पुण्याची प्रभात प्रकट होते. ( उदया-चलामागून सूर्य जसा वर येतो त्याप्रमाणे पापरूपी पर्वताचा अडथळा दूर करून अवताराचा सूर्योदय होताच पुण्याचा प्रकाश फाकतो. )

५६. अशा प्रकारच्या कार्यासाठी उपस्थित होण्यास मी प्रत्येक युगात अवतार घेतो, परंतु या जगात हे जो ओळखतो तोच ( खरा ) विवेकी समजावा.

---

५४. कोंदे—दाटून येणे, भरून येणे. दोंद-( तुंद ) सुखाने वाढलेले पोट. सात्त्विक—रसाचा शरीरावर होणारा परिणाम. सात्विक भाव आठ मानले आहेत—स्तंभ, स्वेद, रोमांच, स्वरभंग, वेपथू, वैवर्ण्य, अश्रू आणि प्रलय. ५५. फीटे—नष्ट होतो. पाहाट फुटणे—उदय होणे.

५७. माझें अजत्व जन्मणें । अक्रियता चि करणें
अविकार जो जाणे । तो मुक्तु मानी ।।

५८. तो चालिला संगें न चले । देहिचा देहा नाकले
मग पंचत्वीं तवं मिळे । माझां चि रूपीं ।।

*वीतरागभयक्रोधाः मन्मया मामुपाश्रिताः ।*
*बहवो ज्ञानतपसा पूता मद्भावमागताः ॥ १० ॥*

[ नाही तृष्णा भय क्रोध माझ्या सेवेत तन्मय
झाले ज्ञान-तपे चोख अनेक मज पावले ]

५९. यऱ्हवीं तऱ्हीं परापर न शोचिति । जे कामनाशून्य होंती
वाटा केव्हलि न वचति । क्रोधाचिये ।।

५७. माझे जन्मरहितत्व म्हणजेच अवताररूपाने जन्म घेणे, माझे नैष्कर्म्य म्हणजेच अवतारकृत्य करणे असे हे माझे अविकारी स्वरूप जो जाणतो तो मुक्त समजावा.

५८. तो (बाह्यतः चारचौघांसारखा) वागत असल्यासारखा दिसला तरी तो निःसंग असतो. देहवान् असला तरी देहभावाने बांधला जात नाही. आणि शेवटी मृत्यू पावतो तेव्हा माझ्याच रूपात विलीन होतो.

५९. वास्तविक पाहता, ते (मुक्त) झाल्यागेल्याचा शोक करीत नाहीत, निष्काम होतात आणि केव्हाही क्रोधाच्या वाटेला जात नाहीत.

---

५७. अजत्व जन्मणें–परमेश्वर हा जन्मरहित असूनही जन्म घेतो यांतील विरोधाभास मुक्त ओळखतो. तसेच तो अक्रिय असूनही विशिष्ट प्रकारचे कर्म आचरतो. अविकार–पण वस्तुतः तो अविकृतच आहे. ५८. पंचत्वी मिळणे–मनुष्याचे शरीर, पृथ्वी, आप, तेज, वायू आणि आकाश या पंचमहाभूतांत मिसळून जाते म्हणून, मरणे. ५९. शोचिति–(शुच्–संस्कृत) दुःख करतात. कामनाशून्य–वासनारहित, अनासक्त, वचति–जातात. वाटा न वचति–वाटेला जात नाहीत, बळी पडत नाहीत.

६०. जे भियां सदा आथिले । माभियांचि सेवा जियाले
का आत्मबोधें तोखले । वीतराग ॥

६१. जे तपोतेजाचे राशी । कां येकायतन ज्ञानासी
जे पवित्रता तीर्थांसि । तीर्थरूप ॥

६२. ते मद्भावा साहाजें आले । मी ते चि होउनि ठेले
जें मज तेयां उरले । पदर नाहीं ॥

६३. सांघै पितलेची गंधिकालिक । फीटली होये निःशेष
तें सुवर्णवाइ आणिक । जोडूं जाइजे ॥

६०. जे माझ्या स्वरूपाने व्यापलेले असतात, माझ्याच सेवेकरिता जिवंत राहतात, किंबहुना आत्मज्ञानाने संतुष्ट होतात ते विरागी होत.

६१. जे तपोरूपी तेजाचे आगर आहेत, ज्ञानाला एकमेव आधार आहेत, (ज्यांच्या ठिकाणी ज्ञान एकीकृत झाले आहे,) (आधीच पवित्र असलेल्या-) तीर्थालाही पवित्रता देणारे असे जे श्रेष्ठ आहेत,—

६२. ते सहजच मत्स्वरूप होतात आणि मी त्यांचेच रूप घेऊन राहतो. कारण की, माझ्यात आणि त्यांच्यात काही निराळेपण राहत नाही.

६३. पितळेचा गंज आणि कळकटपणा पूर्णपणे नाहीसा झाला तर मग सोने मिळविण्याचा प्रयत्न करणे यात काय अर्थ आहे सांग बरे.

---

६०. आथिले-( आथि-अस्ति-सं. ) भरलेले असले. जियाले-जिवंत राहिले. तोखले-तुष्ट झाले. वीतराग-वीत ( गेलेली) आहे राग (आसक्ति) ज्यांचा असे, अनासक्त. ६१. येकायतन-एकमेव स्थान. सरकारी प्रत-तीर्थांसि. तीर्थरूप-तीर्थांचे रूप धारण करणारे, वडील, श्रेष्ठ. ६२. पदर उरणे-( सं. पल्लव ) अंतर राहणे. ६३. गंधिकालिक-गंजणे आणि कळकटणे. काळे डाग पडणे. फिटणे-नाहीशी होणें. निःशेष-संपूर्णतया. सरकारी प्रत-सुवर्ण काइ आणिक. जोडूं जाइजे-मिळवावयास पाहिजे.

**६४. तैसे यमनियमीं कडसले । जे तपोज्ञानीं चोखालले**
**ते मी ते चि जाले । एथ संशयो काइसा ।।**

*ये यथा मां प्रपद्यंते तांस्तथैव भजाम्यहं ।*
*मम वर्त्माऽनुवर्तन्ते मनुष्याः पार्थ सर्वशः ॥११॥*

[ भजती मज जे जैसे भजे तैसा चि त्यांस मी
माझ्या मार्गास हे येती लोक कोणीकडूनि ही ]

**६५. यऱ्हवि तऱ्हीं पाहीं । जे जैसे माझां ठांई**
**भजति तेयां मीं हीं । तैसाचि भजें ।।**

**६६. देखें मनुष्यजात सकल । हें स्वभावता चि भजनशील**
**जालें असे केवल । माझां ठाईं ।।**

*कांक्षंतः कर्मणां सिद्धिं यजंत इह देवताः ।*
*क्षिप्रं हि मानुषे लोके सिद्धिर्भवति कर्मजा ॥१२॥*

[ जे कर्म-सिद्धि वांछुनि यजिती येथ दैवतें
मनुष्य-लोकीं कर्माचें पावती फळ शीघ्र ते ]

**६७. परि ज्ञानेंविण नाशलें । जें बुद्धिभेदासि आलें**
**तेणें एकीं कल्पलें । अनेकत्व ।।**

६४. त्याचप्रमाणे आत्मसंयमनाच्या योगाने जे तावून सुलाखून निघालेले आहेत आणि जे तपोरुपी ज्ञानाने शुद्ध झाले आहेत, ते माझ्याच स्वरूपात विलीन झाले, यात शंका कशाला ?

६५. वास्तविक असे पाहा की, जे माझी जशी भक्ती करतात त्यांच्याशी मीही तसाच वागतो.

६६. लक्षात ठेव की, मनुष्यमात्र हे स्वभावतःच केवळ माझ्या ठिकाणी भक्तिप्रवण झालेले असतात.

६७. परंतु जे अज्ञानामुळे हीनावस्थेला गेले आहेत आणि ज्यांच्या बुद्धीला भ्रंश झाला आहे, त्यायोगे त्यांना एकाच्या ठिकाणी अनेकत्वाचा भास झाला आहे.

---

६४. यमनियमन–आत्मसंयमन. कडसले–तावूनसुलाखून काढलेले. चोखालले–शुद्ध झाले. ६५. भजणे–सेवा करणे, भक्ती करणे. ६६. मनुष्यजात–मनुष्यमात्र. भजनशील–भक्तिप्रवीण. ६७. बुद्धिभेद–बुद्धिभ्रंश. नष्ट होणे.

६८. ह्मणौनि अभेदा भेदु देखति । अनामा नामें ठेविति
देवो देवी ह्मणती । अवाच्यातें ।।

६९. जें सर्वत्र सदा सम । तेथ विभाग अधमोत्तम
मतिवसें संभ्रम । विवंचिती ।।

७०. मग नाना हेतूप्रकारें । यथोचितें उपचारें
मानलीं देवतांतरें । उपासिति ।।

७१. तेथ जें जें काहीं अपेक्षित । तें तैसेंचि पावती समस्त
परि तें कर्मसिद्ध निश्चित । ओळख तूं ।।

७२. वांचूनि देतें घेतें आणिक । निभ्रांत नाहीं सम्यक
येथ कर्म चि फलसूचक । मनुष्यलोकीं ।।

६८. म्हणून त्यांना अभिन्न वस्तूंतही भिन्नता दिसते. जे नामहीन ( असे आत्मतत्त्व ) त्याला नावे देतात आणि जो वर्णनातीत आहे त्याला देव किंवा देवी म्हणतात.

६९. जे ( आत्मतत्त्व ) सर्व ठिकाणी व सर्वकाळी सारखेच असते, त्यात उच्च आणि नीच अशी विभागणी, आपल्या मनातील गोंधळामुळे, दाखवितात

७०. नाना प्रकारच्या कामना मनात धरून यथायोग्य पूजा-साहित्याने अनेक देवदेवता मानून घेऊन त्यांची आराधना करतात.

७१. मग त्यांचे जे जे मागणे असेल ते ते सर्व त्यांना मिळते. परंतु ते सर्व केलेल्या कर्माचेच फळ होय हे तू निश्चयाने जाण.

७२. देणारा किंवा घेणारा त्याच्याशिवाय निःसंशय दुसरा कोणी नाही. या मनुष्यलोकात कर्म हेच फलदायक आहे.

६८. अनामा–ज्याला नावच नाही असा. अवाच्य–वर्णन करण्याच्या पलीकडचा. ६९. मतिवसें–मनोवश होऊन. संभ्रम–गोंधळ, घोटाळा. विवंचिती–मानतात. ७०. हेतूप्रकारें–इच्छा, कामना मनात धरून. उपचार–विधिविधान. मानली–मानून घेतलेली, आवडलेली. देवतांतरे–( मी सोडून ) इतर नाना प्रकारच्या देवता. ७१. कर्मसिद्ध–कर्मामुळे मिळालेले. ७२. वांचूनि–याशिवाय. सम्यक–योग्य.

७३. जैसें क्षेत्रीं जें पेरिजे । तें वाचौनि आन न निफजे
कां पाहिजे तें चि देखिजे । दर्पणाधारें ॥

७४. ना तरि कडेयासि तलवटीं । जैसा आपुला चि बोलु किरीटी
पडिसादा होउनि उठी । निमित्तयोगें ॥

७५. तैसा समस्तां यां भजनां । मी साक्षिभूतु अर्जुना
येथ प्रतिस्फले ते भावना । आपुलाली ॥

*चातुर्वर्ण्यं मया सृष्टं गुणकर्मविभागशः ।*
*तस्य कर्तारमपि मां विद्ध्यकर्तारमव्ययम् ॥ १३ ॥*

[ निर्मिले वर्ण मी चारी गुण-कर्मे विभागुनी
करूनि सर्व हे जाण अकर्ता निर्विकार मी ]

७६. आतां यया चि परी जाण । हे च्यार्‍ही वर्ण
सृजिले मियां गुण-। कर्मविभागें ॥

७३. ज्याप्रमाणे शेतांत जे पेरावे त्यावाचून दुसरे काही उगवत नाही, किंवा आरशाच्या साहाय्याने जे पाहावे तेच दिसते.

७४. किंबहुना, हे अर्जुना, डोंगराच्या तळाशी आपणच बोललेले ( दरीच्या ) निमित्तामुळे प्रतिध्वनिरूपाने उत्पन्न होते.

७५. त्याचप्रमाणे, अर्जुना, या सर्व प्रकारच्या भक्तीला मीच मूलाधार असल्यामुळे आपापल्या भावनेनुरूप ( उपासकांना ) ते ते फळ मिळते.

७६. आता याच रीतीने ( तटस्थपणाने ) ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र हे चारही वर्ण गुण आणि कर्म यांच्या विभागानुसार मीच निर्माण केले आहेत.

---

७३. क्षेत्रीं–शेतात, जमिनीत. दर्पण-आरसा. ७४. कडेयासि–( डोंगराच्या ) कड्याशी. तळवटीं–दरीत, कपारीत. पडिसाद (प्रतिशब्द)–प्रतिध्वनि. निमित्तयोगें–कारणामुळे. ७५. साक्षिभूतु–मूलाधार. वेदान्तात आत्म्याला ‘साक्षी’ म्हणजे तटस्थ मानले आहे. प्रतिस्फले भावना-भावनेनुरूप फळ मिळते. ७६. सृजिले–निर्माण केले. गुणकर्मविभागे–गुण आणि कर्म यांच्य

*न मां कर्माणि लिंपंति न मे कर्मफले स्पृहा ।*
*इति मां योऽभिजानाति कर्मभिर्न स बध्यते ॥ १४ ॥*

[ कर्मे न बांधिती माते फळी इच्छा नसे मज
माझे स्वरूप हे जाणे तो कर्मात हि मोकळा ]

**७७. हें मज चि तव जालें । परि मियां नाहीं केले**
**ऐसें यास जेणें देखिलें । तो सूटला गा ॥**

*एवं ज्ञात्वा कृतं कर्म पूर्वैरपि मुमुक्षुभिः ।*
*कुरु कर्मैव तस्मात्त्वं पूर्वैः पूर्वतरं कृतम् ॥ १५ ॥*

[ केली कर्मे मुमुक्षूनी पूर्वी हे तत्त्व जाणुनी
तैशी तू हि करी कर्मे त्यांचा घेऊनि तो धडा]

**७८. जें प्रकृतिचेनि आधारें । गुणाचेनि व्यभिचारें**
**कर्मे तदनुसारें । विवंचलि ॥**

**७९ येथ येक चि हें धनुषपाणी । परि जालें गा चहूवर्णी**
**ऐसी गुणकर्मि कडसणी । केली साहाजें ॥**

७७. हे सर्व माझ्याचपासून झाले, परंतु मी हे केले नाही असे ( सत्य ) ज्याला उमजले तोच मुक्त झाला. (ऐसे ' यास 'बद्दल ' साच ' असाही पाठ).

७८. मायेच्या आश्रयाने आणि गुणांच्या मिश्रणाने कर्मे संभवतात. तदनुरूप त्यांचे विवेचन केले आहे.

७९. हे धनुर्धारी अर्जुना, जगात सर्व एकाच वर्गाचे आहेत. परंतु (गुण आणि कर्म यांच्या विभागणीमुळे) ते चार वर्णांचे झाले आहेत अशी गुण आणि कर्म यांची स्वाभाविकपणे छाननी केली आहे.

---

विभागानुसार. गुण—सत्व, रजस् आणि तमस्. कर्म—सांप्रतच्या आयुष्यातलि कृती, चाल, आचार वर्तणूक, स्वभाव. ७७. सरकारी प्रत—ऐसें साच. सूटला—कर्मबंधातून, संसारातून, मुक्त झाला. सरकारी प्रत—७७ ओवीचा क्रमांक पुढे ८० हा आहे. ७८. प्रकृति—माया. व्यभिचारे—मिश्रणाने. विवंचिली—विवेचन केले, सांगितली. ७९. धनुषपाणी—धनुष (धनुष्य) आहे पाणीमध्ये ( हातात ) ज्याच्या असा. बहुव्रीही स. धनुर्धारी—अर्जुन. कडसणी—विचार, निवड, व्यवस्था.

८०. ह्मणौनि आइकें पार्था । हे वर्णभेद संस्था
मी करिता नोहें सर्वथा । तें ययाचि हेतू ॥

८१. मागील मुमुक्ष जे होते । तिहीं ऐसें चि जाणोनियां मातें
कर्में केलीं समस्तें । धनुर्द्धरा ॥

८२. परि तियें बीजें जैसीं दग्धलीं । कां नुगवती चि पेरिलीं
तैसि कर्मे चि तेयां जालीं । मोक्षहेतू ॥

*किं कर्म किमकर्मेति कवयोऽप्यत्र मोहिता : ।*
*तत्ते कर्म प्रवक्ष्यामि यज्ज्ञात्वा मोक्ष्यसेऽशुभात् ॥ १६ ॥*

[ नेणती जाणते तेही काय कर्म अकर्म हे
तुज ते सांगतो कर्म जाणूनि सुटशील जे ]

८३. येथ आणिक ही एक अर्जुना । हे कर्माकर्मविवंचना ।
आपुलिये चाडे सज्ञाना । योग्य नव्हे ॥

८०. म्हणूनच हे अर्जुना, ह्या चातुर्वर्ण्य संस्थेचा कर्ता मी अगदी नाही, तेही याच कारणासाठी असे तू समज.

८१. अर्जुना, मागे जे मोक्षार्थी लोक होऊन गेले त्यांनी मला असे (माझे मूळस्वरूप) लक्षात घेऊन सर्व कर्मांचे आचरण केले.

८२. परंतु ज्याप्रमाणे जळून गेलेले बी पेरले तरी उगवत नाही त्याप्रमाणे त्यांची ती (निष्काम) कर्मेच त्यांच्या मोक्षाला कारण झाली.

(ज्याप्रमाणे जाळलेल्या बियांमध्ये उगवण्याचे सामर्थ्य नसते त्याप्रमाणे निष्काम कर्मामध्ये कर्मानुरूप फळ न मिळता मोक्षच मिळतो.)

८३. अर्जुना, येथे आणखी एक गोष्ट आहे. ती ही की, कर्म आणि अकर्म यांचा विचार शहाण्यानेही आपल्याच लहरीनुसार करणे योग्य नाही.

---

८०. करिता—कर्ता. ८२. दग्धलीं ( दह्-सं. ) जाळलेली, भाजलेली. नुगवती—न उगवती—निघत नाहीत. मोक्षहेतू—मोक्षाला कारण. ८३. कर्माकर्म-विवंचना—कर्म कोणते व अकर्म कोणते याचा विवेक. सज्ञाना-शहाण्यांना, जाणत्यांना. चाडे—इच्छेनुरूप.

८४. कर्म ह्मणिजे तें कवण । अथवा अकर्मा काय लक्षण
ऐसें विचारितां विचक्षण । गुंपौनि ठेले ।।

८५. जैसें कां कुडें नाणें । खरेयाचेनि सारिखेपणें
डोलेयांचें ह्रीं पाह्राणें । संशइं घाली ।।

८६. तैसें नैष्कर्म्यतेचेन भ्रमें । गिवंसिजत आह्राति कर्मैं
जिह्रीं दूजी भृष्टी मनोधर्मै । करूं शकती ।।

८७. वांचूनि मूर्खांची गोठी काइसी । एथ मोहलले गा क्रांतदर्शी
ह्मणौनि तेंचि आतां परिहसें । सांघैन तुज ।।

*कर्मणोह्यपि बोद्धव्यं बोद्धव्यं च विकर्मणः ।*
*अकर्मणश्च बोद्धव्यं गहना कर्मणो गतिः ॥ १७ ॥*

[ सामान्य कर्म जाणावे विकर्म हि विशेष जे
अकर्म ते हि जाणावे कर्माचे तत्त्व खोल हे ]

८४. (कारण) कर्म म्हणजे काय अथवा अकर्माचे लक्षण काय याचा विचार करता करता चिकित्सक लोक देखील गुंग होऊन गेले.

८५. ज्याप्रमाणे खोटे नाणे खऱ्यासारखे हुबेहूब दिसत असल्यामुळे डोळ्यांना संभ्रमात पाडते.

८६. त्याप्रमाणे मनात आणले असता दुसरी सृष्टी निर्माण करण्याचे सामर्थ्य आहे अशांचीही कर्मे निष्कर्मत्वाच्या खोट्या कल्पनेने बंधनरूप झाली;

८७. मग मूर्खांची गोष्ट कशाला ? कारण येथे ज्ञानी लोक देखील गोंधळून गेलेले आहेत. म्हणून तोच विषय तुला आता सांगतो. तो तू ऐक.

---

८४. लक्षण–चिन्ह. विचारितां–विचार केला असता. गुंपौनि ठेले–( गुप् सं. ) गुरफटून गेले, किंकर्तव्यमूढ झाले. ८५. कुडें (कूट–सं. )खोटे. संशइं घाली–संभ्रमात पाडते. ८६. भ्रम–खोटी कल्पना, आभास. गिंवसिजत–ग्रासल्या गेल्यामुळे. दुजी सृष्टि मनोधर्में – विश्वामित्राने स्वसामर्थ्याने प्रतिसृष्टी निर्माण केली तसे सामर्थ्य असलेले. ८७. गोठी–गोष्ट. मोहलले–मोह पावले, गुरफटले. क्रांतदर्शी–(क्रांति सं. ) भावी घटना जाणणारे, त्रिकालज्ञ. परिहसैं–(परि+श्रु–सं. ) परिश्रवण कर, ऐक. ‘ परियसीं ’ असा एक पाठ आहे.

८८. तरि हें कर्म ह्मणिजे स्वभावें । जेणें हा विश्वाकारु संभवे
तें सावेव आदीं जाणावें । लागे एथ ।।

८९ मग वर्णाश्रमासि उचित । जें विशेष कर्म विहित
तें ही ओलखावें निश्चित । उपेगेंसीं ।।

९०. पाठिं जें निषिद्ध ह्मणिपे । तें ही बुझावें स्वरूपें
येतुलेनि येथ काहीं न गुंपे । आपैसें चि ।।

९१. यऱ्हवि जग हें कर्माधीन । ऐसी व्याप्ति याची गहन
परि तें असो आइकें चिन्ह । प्राप्ताचें ।।

*कर्मण्यकर्म यः पश्येदकर्मणि च कर्म यः ।*
*स बुद्धिमान् मनुष्येषु स युक्तः कृत्स्नकर्मकृत् ॥ १८ ॥*

८८. ज्याच्या स्वभावामुळे हे विश्व आकारास येते त्या कर्माचे सांगोपांग स्वरूप आधी समजून घेतले पाहिजे.

८९. नंतर वर्णाला आणि आश्रमाला योग्य असे जे शास्त्राने नेमून दिलेले विशिष्ट प्रकारचे कर्म ते देखील त्याच्या उपयोगांसह नीट रीतीने समजून घ्यावे.

९०. शास्त्रामध्ये ज्या कर्मांचा निषेध केला आहे त्यांचेही स्वरूप समजावून घ्यावे. असे केले म्हणजे आपण आपोआपच बिलकुल गोंधळून जाणार नाही.

९१. वास्तविक पाहता जग हे कर्माने व्यापलेले आहे. एवढा त्याचा प्रचंड व्याप आहे; पण मी प्रसंगापुरतेच त्याचे लक्षण सांगतो ते ऐक.

---

८८. विश्वाकारु संभवे-विश्व साकार होते, निर्माण होते. ८. सावेव-सावयव, अंगोपांगासहित. ८९. उपेगेंसीं-उपयोगांसह. वर्णाश्रम-४ वर्ण व ४ आश्रम. आश्रम-ब्रह्मचर्य, गृहस्थ, वानप्रस्थ आणि संन्यास. ९०. पाठिं-शास्त्रांत. (काही प्रतींत पाठी-नंतर असा अर्थ केला आहे.) म्हणिपे-म्हटले जाते. बुझावें-( बुध् - सं; बुज्झ-प्रा.) ओळखावे. गुंपणे-गोंधळणे. आपैसें-अप्रयासे. ९१. व्याप्ति-व्याप. गहन-अनाकलनीय. प्राप्ताचे-प्रस्तुताचे, सिद्धाचे.

[ कर्मी अकर्म जो पाहे अकर्मी कर्म जो तसे
तो बुद्धिमंत लोकांत तो योगी कृत-कृत्य तो ]

९२. जो सकल कर्मि वर्त्तंतां । देखे निष्कर्मता
कर्मसंगें निरासता । फलाचिया ।।

९३. आणि कर्तव्यते लागि । जेया दूसरें नाहिं जगिं
ऐसी नैष्कर्म्यता तरि चांगी । बोधला असे ।।

*यस्य सर्वे समारंभाः कामसंकल्पवार्जिताः ।*
*ज्ञानाग्निदग्धकर्माणं तमाहुः पंडितं बुधाः ॥ १९ ॥*

[ उद्योग करितो सारे काम-संकल्प सोडुनी
ज्ञानाने जाळिली कर्मे म्हणती त्यास पंडित ]

९४. परि क्रियाकलापु आघवा । आचरतु दीसे बरवा
तरि तो इहीं चिन्हीं जाणावा । ज्ञानियां गा ।।

९५. जैसा जो जलापासिं उभा ठाके । तो जन्हें आपणपें जलामाजि देखे
तन्हीं निभ्रांत ओलखे । ह्मणे मीं वेगला आहें ।।

९२. जो सर्व कर्मांचे आचरण करीत असताही मी निष्कर्म आहे हे ओळखतो; जो कर्माच्या संगतीतही फलांच्या बाबतीत निरीच्छता बाळगतो.

९३. आणि कर्म करण्याला ज्याला जगात दुसरे कारण नसते, अशाच्या ठिकाणी निष्कर्मपणा चांगला रुजला आहे (असे जाणावे).

९४. परंतु, जर तो सर्व कर्मे चांगल्याप्रकारे आचरीत असेल तर अशा लक्षणांनी युक्त असलेल्यास ज्ञानी आहे असे ओळखावे.

९५. ज्याप्रमाणे एखादा मनुष्य पाण्याजवळ उभा राहून पाण्यामध्ये आपले रूप पाहतो, परंतु मी (प्रतिबिंबापेक्षा) वेगळा आहे हे निश्चयाने ओळखतो;

---

९२. वर्त्ततां—वागत असता. निरासता—निरीच्छता. ९३. चांगी—चांगल्या तऱ्हेने. बोधला असे—बोध झाला आहे, समजला आहे. ९४. क्रिया कलाप—क्रियासमूह, अवघी कर्मे. बरवा—चांगल्या तऱ्हेने. ९५. आपणपें—स्वतःला.

९६. अथवा नावे हान रिगे । तो थडियेचे रुंखजात देखे वेगें
साचोकारें पाहों लागे । तवं रुख म्हणे अचल ।।

९७. तैसें सकल कर्मी असणें । तें फुडें मानूनिया वायाणें
मग आपणपां जो जाणे । नैष्कर्म्यता ।।

९८. आणि उदोअस्तूचेनि प्रमाणें । जैसें न चलतां सूर्या चालणें
तैसें नैष्कर्म्यत्वीं जाणे । कर्म जो गा ।।

९९. तो मनुष्यासारिखा आवडे । परि मनुष्यत्व तेयासि न घडे
जैसें जलाधारें न बुडे । भानुबिंब ।।

९६. किंवा ज्याप्रमाणे दुसरा एखादा मनुष्य नावेतून जात असताना किनाऱ्यावरील सर्व वृक्ष वेगाने जात आहेत असे पाहतो, परंतु खरेखुरे पाहता ते वृक्ष स्थिर आहेत असेच म्हणतो.

९७. त्याप्रमाणे आपल्या सर्व कर्मांचे आचरण आत्मत्वाच्या दृष्टीने उघडपणे खोटे मानून, जो आपले मूळस्वरूप ओळखतो त्याला खरा निष्कर्मपणा कळतो.

९८. आणि उदय आणि अस्त यांच्या पुराव्यावरून सूर्याला गती नसताना देखील तो चालतो त्याप्रमाणे निष्कर्मा मनुष्यही कर्म करीत असता आपले निष्कर्मत्व स्थिर ठेवतो.

९९. असा मनुष्य सामान्य माणसासारखा वाटतो. परंतु त्याच्या ठिकाणी मनुष्याचे सर्वसामान्य गुण ( सकाम कर्म-प्रवृत्ती ) राहत नाही, ज्याप्रमाणे सूर्याचे प्रतिबिंब पाण्यात पडले तरी (प्रत्यक्ष सूर्य काही) बुडत नाही.

---

९६. हान ( अन्य )–आणि ( ज्ञा. अ. ३–२४० ). थडियेचे (तट )–किनाऱ्यावरील. रुंखजात ( वृक्ष )–झाडांचा समूह, सर्व प्रकारची झाडे. साचोकारें ( सत्याकार )–खरोखर, नीट. अचल-स्थिर. ९७. फुडें (स्फुट)–स्पष्ट. वायाणें–खोटे ९८. उदोअस्तु–उदय आणि अस्त. प्रमाणें-प्रमाणांवरून. ९९. आवडे–दिसतो, वाटतो. भानुबिंब–सूर्याचे बिंब.

१००. तेणें न पांतां विश्व देखिलें । न करितां सर्व केलें
न भोगितां भोगिलें । भोग्यजात ॥

१०१. येके ठाइं बैसला । परि सर्वत्र तो चि गेला
हें असो विश्व जाला । देंहें चि तो ॥

१०२. जेया पुरुषाचा ठांइं । कर्मांचा तरि खेदु नाहीं
परि फलापेक्षा काहीं । संचरेना ॥

१०३. आणि हें कर्म मी करीन । अथवा आदरिलें सिद्धी नेईन
येणें संकल्पें हीं जेयाचें मन । विटाले ना ॥

१०४. ज्ञानाग्नीचेनि मुखें । जेणें जालिलीं कर्में अशेषें
तो ब्रह्मचि मनुष्यवेखें । ओळख तूं ॥

१००. अशा (अनासक्त) माणसाने न पाहताच विश्व पाहिले; न करताच सर्व काही केले आणि न उपभोगताच सर्व भोग्य वस्तूंचा उपभोग घेतला (असे समजावे).

(तो सर्व क्रिया करीत असताना त्या त्या क्रियांपासून तटस्थ वा अलिप्त राहतो.)

१०१. तो एका ठिकाणीच बसून राहतो. परंतु त्याचा संचार सर्वत्र असतो. एवढेच काय पण तो स्वतःच विश्व होतो.

१०२. ज्या पुरुषाच्या ठिकाणी कर्माचरणाचा कंटाळा नाही, परंतु ज्याच्या ठिकाणी फलाची काहीही आसक्ती राहत नाही.

१०३. आणि "मी हे कर्म करीन किंवा सुरू केलेले कर्म तडीस नेईन," या संकल्पाने ज्याचे मन (कधीही) मलिन झाले नाही.

१०४. (आणि) ज्ञानरूपी अग्नीच्या मुखात ज्याने सर्व कर्मांचा होम केला असा मनुष्य मनुष्यवेषात असला तरी तो प्रत्यक्ष परब्रह्मच आहे हे तू ओळख.

---

१००. पातां–पाहता. भोग्यजात–उपभोग्य अशा सर्व वस्तु. १०२. खेदु–कंटाळा. १०३. आदरिलें–स्वीकारलेले. १०४. मनुष्यवेखें–मनुष्याच्या वेषाने, रूपाने.

*त्यक्त्वा कर्मफलासंगं नित्यतृप्तो निराश्रयः ।*
*कर्मण्यभिप्रवृत्तोऽपि नैव किंचित् करोति सः ॥ २० ॥*

[ नित्य-तृप्त निराधार न राखे फल-वासना
गेला गढूनि कर्मात तरी काही करी चि ना ]

१०५. **जो शरीरीं उदासु । फलाभोगीं निरासु ।**
**नित्यता उल्हासु । होउनि असे ॥**

१०६. **जो संतोषाचा गाभारां । आत्मबोधाचेया ओगरा**
**पुरे न ह्मणे चि धनुर्द्धरा । आरोगितां ॥**

१०७. **कैसा अधिकाधिक आवडीं । घेंत महासुखाची गोडी**
**सांडौनि आशांसीं कुरवंडी अहंभावाची ॥**

*निराशीर्यतचित्तात्मा त्यक्तसर्वपरिग्रहः ।*
*शारीरं केवलं कर्म कुर्वन्नाप्नोति किल्बिषम् ॥ २१ ॥*

[ संयमी सोडुनी सर्व इच्छेसह परिग्रह
शरीरें चि करी कर्म दोष त्यास न लागतो. ]

(येथे कर्म म्हणजे कर्माचे फल असा अर्थ आहे.)

१०५. जो इंद्रियसुखांच्या बाबतीत उदासीन असतो, जो कर्मफळाविषयी निरीच्छ असतो आणि जो नेहमी उल्हसित वृत्तीने राहतो,

१०६. अर्जुना, जो आनंदरूपी माजघरात ( भोजनास बसतो ) व जो आत्मज्ञानरूपी जेवण कितीही वाढले तरी पुरे असे म्हणतच नाही,

१०७. तो आत्मानंदाची गोडी अधिकाधिक आवडीने कशी बरे सेवन करीत असतो? तर आशांसह अहंकार ओवाळून टाकतो. ( कर्मफलाची आसक्ती आणि अहंभाव नष्ट करतो.)

---

१०५. नित्यता—नित्यपणे. १०६. गाभारा [ गर्भ+गृह ]—माजघर. सप्तमीचा 'आं' प्रत्यय. ओगरा—भोजनास. आरोगणें—वाढणे. १०७. आशांसी कुरवंडी—अहंभाव आणि आशा हे ओवाळून फेकून देतो व अशा प्रकारे साधक आत्मानंदाचे माधुर्य अधिकाधिक आवडीने चाखीत आस्वाद घेतो.

१०८. **म्हणोनि अवसरें जें जें पावे । तेणें चि तो सुखावे**
**जेया आपुलें आणि परावें । दोन्ही नाहीं ॥**

१०९. **तो दीठी जें पाहे । तें आपण चि होउनि जाये**
**आइके तें आहे । तो चि जाला ॥**

११०. **चरणीं हान चाले । कां मुखें जें जें बोले**
**ऐसें चेष्टाजात तेतुलें । आपण चि जो ॥**

*यदृच्छालाभसंतुष्टो द्वंद्वातीतो विमत्सरः ।*
*समः सिद्धावसिद्धौ च कृत्वापि न निबद्ध्यते ॥ २२ ॥*

[ मिळे ते चि करी गोड न जाणे द्वंद्व मत्सर
फळो जळो जया एक करूनि हि न बांधिला ]

१११. **हें असो विश्वें पाइं । जेया आपणपें वांचूनि नाहीं ।**
**कर्म तें कवण काइ । बाधी तेयातें ॥**

१०८. यामुळे ज्या काळी जे जे प्राप्त होते त्यानेच त्याला आनंद होतो आणि हे माझे आणि हे दुसऱ्याचे ह्या दोन्ही ( भावना ) त्याच्याजवळ राहत नाहीत.

१०९. तो दृष्टीने जे पाहतो तेच आपण स्वतः होऊन जातो आणि तो जे ऐकतो तेही स्वतःच होतो.

( नेत्रेंद्रियाचे आणि कर्णेंद्रियाचे विषय आत्मरूपच आहेत, अशा सर्वात्मभावाने त्याच्या सर्व क्रिया होतात. )

११०. किंबहुना, तो पायांनी चालतो किंवा मुखाने जे जे बोलतो त्या सर्व क्रिया आपणच होतो.

(सर्व क्रिया आत्मरूप मानतो.)

१११. हे तर असोच; पण तो सर्व विश्वदेखील आत्मपणावाचून वेगळे मानीत नाही मग त्याला कोणतेही कर्म कसे बरे बाधेल ?

---

१०८. परावें-दुसऱ्याचे. १०९. दीठी-दृष्टीने. प्रत्ययविरहित तृतीया. ११०. चेष्टाजात-सर्व क्रिया. हान-अन्य, शिवाय. १११. बाधी-आत्मज्ञानाच्या दृष्टीमुळे कर्माचा अडथळा होत नाही.

**११२. आणि हा मत्सरु जेथ उपजे । तें नुरे चि तेया दूजें**
**तो निर्मत्सरू काइ म्हणिजे । बोलवरी ।।**

*गतसंगस्य मुक्तस्य ज्ञानावस्थितचेतसा ।*
*यज्ञायाचरत: कर्म समग्रं प्रविलीयते ॥ २३ ॥*

[ ज्ञानात बैसली वृत्ती संग सोडुनि मोकळा
यज्ञार्थ करितो कर्म जाय सर्व जिरूनि ते ]

**११३. म्हणौनि सर्वां परी जो मुक्तु । तो सकर्मु चि कर्मरहितु**
**सगुणु परि गुणातीतु । येथ भ्रांति नाही ।।**

**११४. तो देहसंगें तरि असे । परि चैतन्या सारिखा दीसे**
**पाहांतां परब्रम्हाचेनि कसें । चोखालु भला ।।**

**११५. ऐसा ही तो कवतिकें । जरि कर्में करीं यज्ञादिकें**
**तरि तियें लया जांति अशेषें । तेयांचा चि ठाइं ।।**

११२. आणि ज्याच्यामुळे मत्सर उत्पन्न होतो ती दुसरी व्यक्तीच राहत नसल्यामुळे त्याला निर्मत्सर म्हणून संबोधणे देखील नको. ( मत्सर वाटण्यासाठी दुसरी व्यक्ती पाहिजे असल्यामुळे तो स्वयंसिद्ध निर्मत्सर असतो. )

**११३.** म्हणून सर्वार्थाने जो मुक्त आहे, तो सकर्म असूनही कर्मरहित असतो. सगुण, असूनही गुणातीत असतो यात शंका नाही.

११४. तो जरी देहधारी असला तरी केवळ चैतन्यरूपच असतो. आणि परब्रह्माची कसोटी लावून पाहता निखळ शुद्ध दिसतो.

११५. अशा माणसाने यज्ञादिक कर्मे मौजेखातर केली तरी ती त्याच्याच ठिकाणी संपूर्णपणे विलीन होतात.

---

११२. बोलवरी-शब्दमात्राने. ११३. सर्वां परी-सर्व प्रकारांनी. गुणातीत-(गुण+अतीत ) गुणांच्या पलीकडे असलेला, निर्गुण. ११४. कसें-निकषाने. ११५. चोखाळु-हीणकस नाही असे. पवित्र.

११६. अकालिचीं अभ्रें जैसीं । ऊर्मीवीण आकाशीं
हारपति आपैसीं । उदैलीं सांतीं ।।

११७. तैसि विधिविधानरहितें । जऱ्हीं आचरला तो समस्तें
तऱ्हीं तिये ऐक्यभावें ऐक्यातें । पावतील ।।

११८. जें हें हवन मी होता । कां इये यज्ञीं हा भोक्ता
ऐसी बुद्धीसि नाहीं भिन्नता । म्हणोनियां ।।

११९. जें यष्टा यज्ञ यजावें । ते हविर्मंत्रादीक आघवें
तो देखे अविनाभावें । आत्मबुद्धी ।।

*ब्रह्मार्पणं ब्रह्म हविर्ब्रह्माग्नौ ब्रह्मणा हुतं ।*
*ब्रह्मैव तेत गंतव्यं ब्रह्मकर्मसमाधिना ॥२४॥*

[ ब्रह्मात होमिले ब्रह्म ब्रह्माने ब्रह्म लक्षुनी
ब्रह्मी मिसळले कर्म तेव्हा ब्रह्म चि पावला ]

११६. ज्याप्रमाणे अवकाळी आलेले ढग वर्षाव न करताच आकाशामध्ये जसे उत्पन्न झाले तसेच आपोआप नाहीसे होतात.

११७. त्याप्रमाणे अशा माणसाने आचरलेली (यज्ञादिक कर्मे) शास्त्राने सांगितलेल्या पद्धतीप्रमाणे केलेली नसली तरी, ती कर्त्याच्या ठिकाणी ऐक्यभाव असल्याने त्यांच्यातच एकरूप होऊन जातात.

११८. कारण की, ही आहुती, हा आहुती टाकणारा आणि हा या यज्ञातील भोक्ता अशा प्रकारचा भेदभाव बुद्धीला राहतच नाही.

११९. कारण की, यज्ञ करणारा, यज्ञ, आहुती आणि यज्ञातील सर्व मंत्र वगैरे तो आत्मबुद्धीने व एकरूपतेने पाहतो.

---

११६. उर्मीविण–वृष्टीवाचून. आपैसी–अप्रयासे. उदयलीं सांतीं–उदय पावली असताना; संस्कृतातील सति-सप्तमीसारखी रचना. 'उत्पद्यन्ते विलीयन्ते दरिद्राणां मनोरथाः' असे म्हणतात त्याप्रमाणे. ११७. निष्काम कर्म करणाऱ्या माणसाला विधिविधानांची आवश्यकता नाही. विधिविधान–शास्त्रपद्धती. ११८. होता–(होतृ)–हवन करणारा, यज्ञ करणारा. ११९. यष्टा–यज्ञ करणारा. यजावें–आहुती टाकावी. हविर्मंत्र–यज्ञातील मंत्र.

१२०. ह्मणौनि ब्रह्म तें चि कर्म । ऐसें बोधा आलें जेया सम
तेया कर्तव्य तें नैष्कर्म्य । धनुर्द्धरा ।।

१२१. आतां अविवेककुमारत्वा मूकलें ।
जेया विरक्तीचें पाणिग्रहण जालें
मग उपासन जिहिं आणिलें । योगाग्नीचें ।।

१२२. जे यजनशील अहर्निशीं । जिहीं अविद्या हवीली मनेंसीं
गुरुवाक्य हुताशीं । हवन केलें ।।

१२३. तिहीं योगाग्नीकिं यजिजे । तो दैवयज्ञु वीजे
तेथ आत्मसुख कामिजे । पांडुकुमरा ।।

*दैवमेवापरे यज्ञं योगिनः पर्युपासते ।*
*ब्रह्माग्नावपरे यज्ञं यज्ञेनैवोपजुव्हति ॥ २५ ॥*

[ देवताराने यज्ञ योगी कोणी अनुष्ठिती
ब्रह्माग्नीत तसे कोणी यज्ञे यज्ञत्व जाळिती ]

**१२०.** म्हणून ब्रह्म तेच कर्म होय असे सारखेपण ज्याच्या अनुभवास आले त्याला, हे अर्जुना, कर्म करणे म्हणजेच कर्म न करणेच होय.

१२१. आता अविवेकरूपी पोरकटपणा ज्यांनी ओलांडला आहे, ज्यांनी विरक्तीशी विवाहसंबंध जोडला आहे आणि ज्यांनी योगाग्नीची भक्ती आरंभिली आहे;

१२२. जे रात्रंदिवस योगयज्ञात गढलेले आहेत, ज्यानी मनाबरोबर अविद्येचा होम केला आहे; आणि गुरुपदेशाच्या मंत्राग्नीत (अज्ञानाची) आहुती टाकली आहे.

**१२३.** त्यांनीच हा योगयज्ञ करावा. तोच दैवयज्ञ निर्माण होतो. आणि त्या ठिकाणी हे अर्जुना, आत्मसुखाचा लाभ होतो.

---

१२०. अविवेककुमारत्व–अज्ञानरूपी कुमारावस्था, हूड पोरपणा. ही अज्ञानावस्था जाऊन वैराग्य अंगीं बाणल्याशिवाय अग्निहोत्राचा स्वीकार करता येत नाही १२२. गुरुवाक्यहुताशी–गुरुवाक्य हीच मंथा किंवा अरणी. १२३. वीजे–उत्पन्न होतो. वीजे–सरकारी प्रत. कामिजे–आत्मसुख हेच या यज्ञातील काम्य होय.

**१२४. आतां अवधारीं सांगैन आणिक । जे ब्रह्माग्निक साग्निक**
**तेयांतें यज्ञें चि यज्ञु देख । उपासिजे ।।**

**१२५. एक संयमाग्नी होत्री । ते युक्तित्रयाचां मंत्रीं**
**यजन करिति पवित्रीं । इंद्रियद्रव्यीं ।।**

*श्रोत्रादीनींद्रियाण्यन्ये संयमाग्निषु जुव्हति ।*
*शब्दादीन् विषयानन्य इंद्रियाग्निषु जुव्हति ॥२॥*

[ श्रोत्रादि इंद्रिये कोणी संयमाग्नीत होमिती
कोणी विषय शब्दादि इंद्रियाग्नीत अर्पिती ]

**१२६. एकां वैराग्यरवी विवललें । तवं संयती विहार केले**
**तेथ अपावृत जाले । इंद्रियानल ।।**

**१२७. तिहीं विरक्तिची ज्वाला घेतली ।**
**तवं विकारांचीं इंधनें पलिपलीं**
**तेथ आशाधूमें सांडिलीं । पांचै कुंडें ।।**

१२४. आता, आणखी काही यज्ञ प्रकार सांगतो ते ऐक. जे ब्रह्माग्नीने अग्निहोत्र करतात ते त्या यज्ञानेच-ब्रह्मयज्ञाने-यज्ञाची उपासना करतात.

१२५. काहीएक मनोनिग्रहरूप अग्निहोत्र आचरतात आणि ते युक्तित्रयाच्या मंत्रांनी इंद्रियरूपी द्रव्याची पवित्र आहुती देतात.

१२६. कोणी एकाचा वैराग्यरूपी सूर्य प्रकट होतो त्यावेळी ते संयमनरूपी विहार तयार करतात आणि त्यांचे इंद्रियरूपी अग्नी पेट घेऊन भडकतात.

१२७. मग विरक्तीची ज्वाळा प्रज्वलित झाली म्हणजे विकाररूपी इंधने पेट घेतात आणि आशारूपी धूर पंच-ज्ञानेंद्रियरूपी कुंडाना सोडून जातो.

---

१२५. संयमाग्नि-आत्मसंयमरूपी अग्नी. युक्तित्रय-कायिक, वाचिक, आणि मानसिक अशा तीनही प्रकारांच्या युक्तिरूपी मंत्रांनी किंवा ध्यान, धारणा व समाधि या युक्तींनी. १२६. विवळले-प्रगट झाले. अपावृत-उघडे झाले, पेटले. १२७. पलिपलीं-पेटलीं. पलिता या शब्दात पलिपणे हाच धातू आहे.

१२८. मग वाक्यविधीच्चिया निरिविडी । विषयाहुती उद्दंडीं
हवन केलें कुंडीं । इंद्रियाग्नीचां ॥

*सर्वाणींद्रियकर्माणि प्राणकर्माणि चापरे ।*
*आत्मसंयमयोगाग्नौ जुव्हाति ज्ञानदीपिते ॥ २७ ॥*

[ प्राणेंद्रिय-क्रिया कोणी सर्व होमूनि टाकिती
चिंतनाने समाधीस अंतरी चेतवूनिया ]

१२९. येकिं यियाचि परीं पार्था । दोष क्षपिले सर्वथा
आणिकीं हृदयारणीं मंथा । विवेकु केला ॥

१३०. तो उपशमी निहिटिला । धैर्यें वरी दाटिला
गुरुवाक्यें काढिला । बलिकटपणें ॥

१३१. ऐसें समरसें मंथन केलें । तेथ झडकरी काजा आलें
जें उज्जीवन जालें । ज्ञानाग्नीचें ॥

१२८. आणि नंतर शास्त्रवाक्यावर विश्वास ठेवून इंद्रियाग्नीच्या कुंडात विषयांच्या विपुल आहुती टाकतात.

१२९. अर्जुना, अशा प्रकारे काहींनी आपले सर्व दोष नष्ट केले आणि दुसऱ्या काहींनी हृदयरूप अरणीवर (लाकडावर) विवेकरूपी मंथा केला आणि--

१३०. तो मनाच्या समाधानाने जखडून, धैर्यरूपी दाबाने घासून, गुरुवाक्याच्या सामर्थ्याने घुसळून काढला.

१३१. अशा प्रकारे समदर्शनबुद्धीने घर्षण केल्यावर त्याचे लवकरच फळ मिळाले. ते असे की ज्ञानरूपी अग्नीचे उज्ज्वलन झाले.

---

१२८. निरविडी-निरवून, अनुसरून. १२९. क्षपिले-सोडले. अरणी व मंथा-ही अग्निहोत्र्यास उपयोगी पडणारी लाकडे आहेत. अरणी खाली धरून मंथा त्यावर जोराने घासला म्हणजे यज्ञाचा अग्नि तयार होतो. १३०. निहिटला-घुसळला. दाटिला-दाब दिला. १३१. समरसें-एकमेकाला चिकटून हा एक अर्थ. समदर्शनबुद्धीने हा दुसरा. उज्जीवन-प्रज्वलन.

१३२. पहिला रिद्धिसिद्धीचा संभ्रमु । तो निवर्तौनि गेला धूमु
मग प्रकटला सूक्ष्मु । विस्फुलिंगु ।।

१३३. तेया मनाचें मोकलें । पेटवण घातलें
जे यमनियमीं हळुवारलें । आइतें होतें ।।

१३४. तेणें सांधुक्षणें ज्वाला समृद्धा ।
तेथ वासनांतराचिया समिधा
स्नेहेंसि विविधा । जालीलीया ।।

१३५. मग सोहंमंत्रीं दीक्षितिं । इंद्रियकर्माचिया आहुती
तिये ज्ञानानलीं प्रदीप्तीं । दीधलिया ।।

१३२. प्रथमतः ऋद्धिसिद्धीचा मोहरूपी धूर हा निघून गेला आणि ज्ञानाची सूक्ष्म ठिणगी प्रगट झाली.

१३३. निग्रहामुळे वाळून आपोआपच हलके झालेले व विषयातून मोकळे झालेले जे मन त्याचे पेटवण घातले.

१३४. त्यामुळे धुमसलेल्या आणि भडकलेल्या ज्वाला उसळल्या. मग त्यात आसक्तिरूपी घृतासह वासनांच्या समिधा जाळून टाकल्या.

१३५. त्यानंतर 'सोऽहं' असा मंत्र म्हणून दीक्षितांनी त्या पेटलेल्या ज्ञानरूपी अग्नीत आपल्या इंद्रियकर्मांच्या आहुती दिल्या.

१३२. रिद्धिसिद्धीचा संभ्रम–योगसाधनात ऋद्धिसिद्धीच्या मोहाने कित्येक योगी भ्रष्ट होतात त्यास अनुसरून ऋद्धिसिद्धींच्या मोहावर धुराचे रूपक केले आहे. अग्नी पेटवताना पहिला धूर तसाच जाऊ द्यावा लागतो तद्वत् योगसाधनेत ऋद्धिसिद्धी सोडून द्याव्या लागतात असा आशय. १३३. मोकलें–विषयवासनांतून मुक्त झालेले. हळुवारलें–हलके झालेले. आइते–आपोआप. १३४ सांधुक्षण–(सम् + धुक्ष् –सं) पेटणे. समिधा–यज्ञात टाकावयाची लाकडे. वासनांतर–अनेक वासना. स्नेह–या शब्दावर (१) आसक्ती व (२) घृत (तूप) असा श्लेष. १३५. सोहं–मीच आत्मा आहे अशा अर्थाचा मंत्र. दीक्षित–दीक्षा घेतलेला.

**१३६. पाठिं प्राणक्रियेचेन स्रुवेनसीं । पूर्णाहुति पडिली हुताशीं**
**तेथ अवभृत समरसीं । साहाजें जालें ।।**
**१३७. मग आत्मबोधिचें सुख । तें जैसें संयमाग्नीचें शेष**
**तो चि पुरोडाशु देख । घेतला तिहिं ।।**
**१३८. येक ऐसां यजनीं । मुक्त जाले गा त्रिभुवनीं**
**इया यज्ञक्रिया तरि आनानीं । परि प्राप्य तें एक ।।**

*द्रव्ययज्ञास्तपोयज्ञा योगयज्ञास्तथापरे ।*
*स्वाध्यायज्ञानयज्ञाश्च यतयः संशितव्रताः ॥ २८ ॥*

[ द्रव्ये जपे तपे योगे चिंतने वा अशापरी
संयमी यजिती यज्ञ व्रते प्रखर राखुनी ]

**१३९. येक द्रव्ययज्ञ म्हणपती । एक तपसामग्रिया निफजति**
**येक योगयाग ही आहाती । जे सांघीतले ।।**

१३६. नंतर प्राणकर्मरूपी स्रुवानामक दर्भपात्रासह अग्नीत शेवटची आहुती पडली आणि ब्रह्मतादात्म्याच्या अवस्थेत यज्ञसमाप्तीचे अवभृत-स्नान घडले.

१३७. त्यानंतर संयम-यज्ञातील उरलेला हविर्भाग म्हणजे आत्मयज्ञाचा आनंद, तोच त्यांनी यज्ञप्रसाद म्हणून घेतला.

१३८. कोणी एक अशा प्रकारच्या यज्ञांनी त्रैलोक्यात मुक्त झाले या सर्व यज्ञक्रिया वेगवेगळ्या असल्या तरी त्यांचे साध्य एकच आहे.

१३९. कोणी द्रव्ययज्ञ म्हणतात; एकाचे तपःसाहित्य (तपोयज्ञ) निर्माण होते; कोणी योगयज्ञही करतात; हे प्रकार तुला पूर्वी सांगितलेलेच आहेत.

---

१३६. पाठिं–नंतर. स्रुवेनशी–पूर्णाहुतीच्या वेळी स्रुक् आणि स्रुवा ही यज्ञपात्रे देखील आहुतीत टाकावी लागतात. म्हणून प्राणक्रिया ही योगास साधनीभूत असते. परंतु योगयज्ञात तिचीही पूर्णाहुती टाकावी लागते. प्राणक्रियेवर स्रुवेचे रूपक. अवभृथ–यज्ञान्ती करावयाचे स्नान. समरसीं–परब्रह्मात लीन होणे. १३७. पुरोडाश–यज्ञप्रसाद. १३८. आनानीं–(अन्य अन्यः) वेगवेगळ्या. १३९. तपसामग्रिया–तपाचे साहित्य; म्हणजेच तपोयज्ञ. 'म्हणिपती' असा एक पाठ आहे.

**१४०. येंकि शब्दीं शब्द चि यजिजे । तो वाग्यज्ञु म्हणिजे**
**ज्ञानें ज्ञेय गमिजे । तो ज्ञानयज्ञु ॥**

**१४१. हें अर्जुना सकल कुवाडें । जें अनुष्ठितां अति सांकडें**
**परि जितेंद्रियांसी चि घडे । योग्यतावसें ॥**

**१४२. ते प्रवीण येथ भले । योगसमृद्धी आथिले**
**म्हणौनि आपणपां तिहीं केलें । आत्महवन ।**

*अपाने जुव्हति प्राणं प्राणेऽपानं तथापरे ।*
*प्राणापानगती रुध्द्वा प्राणायामपरायणः ॥ २९ ॥*

[ होमिती एकमेकात कोणी प्राण-अपान ते
रोधूनि गति दोहोंची प्राणायामास साधिती ]

**१४३. एक अपानाग्नीचां मुखीं । प्राणद्रव्यें देखें**
**हवन केलें एकीं । अभ्यासयोगें ॥**

१४०. कोणी शब्दाद्वारां शब्दांचीच आहुती टाकतात; त्याला वाग्यज्ञ म्हणावे. आणि जेथे ज्ञानामुळे ज्ञेय ( ब्रह्मतत्त्व ) प्राप्त करून घेतात, त्याला ज्ञानयज्ञ म्हणावे.

**१४१.** हे अर्जुना, ही सारी यज्ञाची कोडी उकलणे फार कष्टाचे काम आहे. परंतु इंद्रिये स्वाधीन ठेवणाऱ्याला त्याच्या योग्यतेमुळे हे साध्य होते.

१४२. ते फार कुशल आणि योगसामर्थ्यसंपन्न असल्यामुळे त्यांना आपल्या जीवात्म्याचे परमात्म्यामध्ये हवन करता आले.

१४३. आणखी असे पाहा की, कोणी अभ्यासाच्या योगाने अपान-वायुरूपी अग्नीच्या मुखात प्राणरूपी द्रव्याची आहुती देतात.

---

१४०. शब्दीं शब्दाचि यजिजे-शब्दाच्या साह्याने निःशब्द अशा आत्म्याचे स्तवन करणे. १४१. कुवाडें-कोडे. १४२. योगसमृद्धी आथिले-योगाच्या वैभवाने संपन्न झाले. आपणपां-आत्मत्वाने; आत्मज्ञानाने. आत्महवन-जीवात्म्याची आहुती. १४३. प्राणद्रव्य-योगशास्त्रात पाच प्राण मानले आहेत. ते प्राण, अपान, व्यान, उदान आणि समान हे होत. त्यांचा एकमेकांशी योग किंवा प्राण अपान यांचा निरोध करण्याच्या क्रियेला प्राणायाम म्हणतात. 'देखैं' ऐवजी 'देखी' असा एक पाठ आहे.

**१४४. एक अपानु प्राणीं अर्पिती । एक दोहींतें हीं निरुंधिती**
**ते प्राणायामी म्हणिपती । पांडुकुमरा ।**

*अपरे नियताहाराः प्राणान्प्राणेषु जुव्हति ।*
*सर्वेऽप्येते यज्ञविदो यज्ञक्षपितकल्मषाः ॥ ३० ॥*

[ प्राणांत होमिती प्राण कोणी आहार तोडुनी
यज्ञ-वेत्ते चि हे सारे यज्ञाने दोष जाळिती ]

**१४५. येक वज्रयोगक्रमें । सर्वाहारसंयमें**
**प्राणीं प्राणु संभ्रमें । हवन करिती ॥**

**१४६. ऐसे मोक्षकाम सकल । समस्त हे यजनशील**
**जिहीं यज्ञद्वारीं मल । क्षालन केलें ॥**

*यज्ञशिष्टामृतभुजो यान्ति ब्रह्मसनातनम् ।*
*नायं लोकोऽस्त्ययज्ञस्य कुतोऽन्यः कुरुसत्तम ॥ ३१ ॥*

[ यज्ञशेषामृते धाले पावले ब्रह्म शाश्वत
न यज्ञाविण हा लोक कोठूनि पर-लोक तो ]

१४४. कोणी प्राणवायूमध्ये अपानवायूचे अर्पण करतात. कोणी प्राण आणि अपान या दोहोंचाही निरोध करतात. हे अर्जुना, अशांना (योग्यांना) प्राणायामी म्हटले जाते.

१४५. कोणी वज्रयोग नावाच्या पद्धतीने सर्व आहारांचे नियमन करून प्राणाचे प्राणाच्याच ठिकाणी मोठ्या धैर्याने हवन करतात.

१४६. अशा प्रकारे सर्व प्रकारचे यज्ञ करणारे आणि ज्यांनी यज्ञाच्या द्वारे मनाचा मळ धुऊन टाकलेला आहे, ते सर्व मोक्षार्थीच असतात.

---

१४४. निरुंधिति–नियमन करतात. प्राणीयामीं म्हणिपती–ते प्राणायामी म्हटले जातात. १४५. वज्रयोग–हटयोग. सर्वाहार–सर्व इंद्रियांचा उपभोग. संभ्रमें–उत्कटतेने, धैर्याने. १४६. मोक्षकाम–मोक्षाची इच्छा करणारे. मल-क्षालन–पापाची निवृत्ती.

१४७. जेयां अविद्याजात आकलितां । जें उरलें निज स्वभावता
तेथ अग्नि आणि होता । उरेचिना ।

१४८. जेथ यजितेयाचा कामु पुरे । यज्ञीचें विधान सरे
माघौतें जेथौनि ऽसरे । क्रियाजात ।।

१४९. विचार जेथ न रिगे । हेतु जेथ नेघे
जें द्वैतदोषसंगें । सिंपे चि ना ।।

१५०. ऐसें अनादिसिद्ध चोखट । जें ज्ञानयज्ञांवशिष्ट
तें ते सेविति ब्रह्मनिष्ठ । ब्रह्माहमंत्रें ।।

१५१. ऐसे सेखामृतें धाले । कीं अमृतभावासि आलें
म्हणौनि ब्रह्म ते जाले । अनायासें ।।

१४७. ज्यांचे सर्व अज्ञान ( मायामोह ) निरास झाले आहे आणि जे केवळ आत्मरूपानेच शिल्लक राहिले आहेत, त्यांच्या बाबतीत अग्नी आणि अग्निहोत्री (हे नाते) उरतच नाहीत.

१४८. ज्या ठिकाणी यज्ञ करणाऱ्याची मनीषा तृप्त होते आणि यज्ञक्रिया संपून जाते आणि सरतेशेवटी ज्यापासून सर्वच क्रिया नाहीशा होतात.

१४९. ज्या ठिकाणी विचार राहत नाही, हेतू टिकाव धरीत नाही, आणि द्वैतभावनेचा दोष बाधत नाही.

१५०. तेथे अशा प्रकारे ज्ञानयज्ञाच्या शेवटी उरणारे जे 'अनादि' म्हणून सिद्ध झालेले निर्दोष ज्ञान ते ब्रह्मनिष्ठ लोक 'ब्रह्माहम्' ( मी ब्रह्म आहे ) या मंत्राने सेवन करतात.

१५१. अशा रीतीने शेवटी मिळणाऱ्या आत्मज्ञानामुळे जे तृप्त झाले आहेत, किंवा मोक्षपदाला पोचले आहेत ते आपोआपच ब्रह्मस्वरूप होतात.

---

१४७. आकलितां ऐवजी 'जाळितां' असा पाठभेद. अविद्याजात–सर्व प्रकारचे मायामोह, अज्ञान. निजस्वभावता–आत्म्याच्या स्वरूपाने. होता–यज्ञकर्ता. १४८. कामु–इच्छा, विधान–प्रक्रिया. माघौतें–नंतर. ऽसरे–संपे. १४९. न रिगे–प्रवेश करीत नाही. नेघे–स्पर्श करीत नाही, सिंपे चि ना–स्पर्श करीत नाही, लिप्त होत नाही. १५०. अनादिसिद्ध–स्वयंसिद्ध. चोखट–शुद्ध, चोख. ज्ञानयज्ञावशिष्ट–ज्ञानयज्ञातून उरलेलें. ब्रह्माहमंत्र–('ब्रह्माहंमंत्रें' असा पाठभेद) अद्वैताचा मंत्र, म्हणजेच 'सोऽहम्' असा मंत्र. १५१. सेखामृत (शेषामृतें) यज्ञाच्या शेवटी मिळणारे अमृतासारखे ज्ञान.

१५२. एरां विरक्ती माल न घली चि ।
जेयां संयमाग्नीची सेवा न घडे चि ।
जे योगयागु ही न करिती चि । जन्मले सांते ।।

१५३. एयां ऐहिक ही एक धड नाहीं ।
मग परत्रीक सांघिजैल काइ ।
म्हणौनि असो हे गोठि पाइं । पांडुकुमरा ।।

*एवं बहुविधा यज्ञा वितता ब्रह्मणो मुखे ।*
*कर्मजान्विद्धि तान्सर्वानेवं ज्ञात्वा विमोक्ष्यसे ॥ ३२ ॥*

[ विशेष बोलिले वेदें असे यज्ञ अनेक हे
कर्मानें घडिलें जाण जाणूनि सुटशील तूं ]

१५४. एसे बहुतीं परीं अनेग । जे सांघितले का याग
ते विस्तारूनि वेदें चांग । ह्मणितले आहाति ।।

१५२. अशांशिवाय इतरांना की ज्यांना चित्तनिरोधरूपी अग्नीची सेवा घडत नाही आणि जे जन्माला येऊन हा योगयज्ञ संपादन करीत नाहीत, त्यांना विरक्ती माळ घालीत नाही. (त्यांना वैराग्य कधीही लाभत नाही. )

१५३. ज्यांना लौकिक क्रियाही नीटपणे संपादिता येत नाहीत त्यांना पारलौकिकाची गोष्टच बोलावयास नको. अर्जुना, अशी ही गोष्ट आहे, हे लक्षात ठेव.

१५४. अशा पुष्कळ प्रकारांचे मी जे तुला अनेक यज्ञ सांगितले, त्यांचे वेदांमध्ये विस्ताराने चांगले निरूपण केले आहे.

---

अमृत या शब्दावर श्लेष. अमृतभाव–अमरत्वाची अवस्था, आत्मरूपता. १५२. विरती माल न घलो चि–विरती ही योग्याची स्त्री कल्पिली आहे. ती स्वीकार करीत नाही. जन्मले सांते–संस्कृत सतिसप्तमीची रचना. १५३. ऐहिक–या ( इह ) जन्मातील. परत्रीक ( पारत्रिक हे शुद्ध रूप ) परलोकातील. सांघिजैल–नशिबातील गोष्ट सांगणे.

१५४. बहुतीं परीं–पुष्कळ प्रकारांनी. अनेग–अनेक. संस्कृतातून मराठीत

**१५५. परि तेणें विस्तारें काइ करावें । हें कर्मसिद्ध जाणावे**
**एतुलेनि कर्मबंधु स्वचावें । पावैल ना ।।**

**१५६. अर्जुना वेदु जेहाचें मूल । जें क्रियाविशेषें स्थूल**
**जेयां नव्हालियेचें फल । स्वर्गसुख ।।**

*श्रेयान्द्रव्यमयाद्यज्ञाज्ज्ञानयज्ञः परंतप ।*
*सर्वं कर्माखिलं पार्थ ज्ञाने परिसमाप्यते ॥ ३३ ॥*

[ द्रव्य-यज्ञादिकांहूनि ज्ञान-यज्ञ चि थोर तो
पावती सगळी कर्मे अंतीं ज्ञानात पूर्णता ]

**१५७. ते द्रव्ययाग किर होंती । परि ज्ञानयज्ञाची सरी न पवती**
**जेवि तारातेज संपती । दिनकरेंसीं ।।**

१५५. परंतु आपल्याला त्या विस्ताराशी काय करावयाचे आहे? अशा प्रकारे केलेले यज्ञ हे कर्मामुळे घडविलेले आहेत असे समजावे आणि म्हणून असे कर्म स्वाभाविकपणेच बंधनकारक होईल ना!

१५६. अर्जुना, ज्यांचे मूळ वेद आहेत व जे बाह्यक्रियाप्रधान स्थूल (यज्ञ) आहेत आणि ज्यांच्या अपूर्वतेचे फळ स्वर्गसुख आहे.

१५७. अशा प्रकारचे ते यज्ञ म्हणजे खरोखर द्रव्ययज्ञच होत. परंतु ज्याप्रमाणे सूर्याशी तारकांच्या तेजाचे वैभव बरोबरी करू शकत नाही त्याप्रमाणे (त्यांना द्रव्ययज्ञांना ) ज्ञानयज्ञाची बरोबरी येणार नाही.

---

शब्द येताना 'क' चा 'ग' होतो. सांधितले–निरूपण केले, फोड केली. म्हणितले आहाति–निरूपण केले गेले आहेत. १५५. कर्मासिद्ध–कर्मापासून उत्पन्न झालेले. एतुलेनि–एवढ्याने, ह्यांच्यामुळे. कर्मबंधु ना पावैल–कर्माचे बंधन पावणारच. काही प्रतीत पावणार नाही असा अर्थ आहे. १५६, जेहाचें–जयाचे, ज्याचे. महाप्राण हे मराठीचे वैशिष्ट्य आहे. क्रियाविशेषे–बाह्यक्रियाच ज्यात प्रधान आहेत. नव्हाली–नवलाई, अपूर्वता. १५७. किर (किल)–खरोखर. सरी–बरोबरी. तारातेजसंपत्ती हा एक शब्द वाचावा. संपत्ती–वैभव, थोरवी.

**१५८. देखें परमात्मसुखनिधान । साधावेया योगीजन**
**जें न विसंभति अंजन । उन्मेखनेत्रीं ।।**

**१५९. जें धावतेया कर्माची लाणि । नैष्कर्म्य बोधाची खाणि**
**जें भूकेलेयां धणि । साधनाची ।।**

**१६०. जेथ प्रवृत्ति पांगुळ जाली । तर्काचि दृष्टि गेली**
**जेणें इंद्रियें विसरलीं । विषयसंगू ।।**

**१६१. मनाचें मनपण गेलें । जेथ बोलांचें बोलणें ठेलें**
**जेया माजि सांपडलें । ज्ञेय दीसे ।।**

१५८. असे पाहा की, परमात्मसुखाचा गुप्त ठेवा सापडावा म्हणून आपल्या स्फूर्तिरूपी डोळ्यांमध्ये घालावयाचे जे अंजन योगी लोक कधीही सोडत नाहीत;

१५९. जे चालू असलेल्या कर्माची सीमा आहे, निष्कर्मपणाच्या बोधाची खाण आहे, जिज्ञासु साधकांना साधनपूर्तीचे समाधान आहे;

१६०. ज्या ज्ञानाच्या ठिकाणी कर्माची आवड लंगडी पडते, तर्क आंधळा होतो, ज्याच्या योगाने इंद्रिये विषयांची संगती विसरून जातात;

१६१. मनाचे मनपण (चांचल्य) नाहीसे होते, ज्या ठिकाणी शब्दांचा शब्दपणा (आविष्कारशक्ती) खुंटून जाते, आणि ज्याच्यामध्ये ज्ञेय (ज्ञानाचा विषय) साक्षात् प्रत्ययाला येते;

---

१५८. परमात्मसुख–निधान–आत्मिक आनंदाचा गुप्त खजिना. साधावया–साध्य करण्यासाठी, मिळविण्यासाठी. न विसंभति–( वि + श्रम्भ मूळ धातु ) सोडीत नाहीत. उन्मेख–नेत्रीं–उन्मेषरूपी डोळ्यात. येथे दिव्यांजन डोळ्यात घातले असता साधकाला जमिनीतील गुप्त धन प्रगट होते, हा ज्ञानेश्वरकालीन संकेत ज्ञानेश्वरीत बरेचदा येतो. उत्स्फूर्त ज्ञानामुळे आत्मानंद मिळतो, हा भाव. १५९. धावतेया-दैनंदिन चालू असलेल्या. लाणि–( लयन–सं. ) = मर्यादा. बोधाची खाणि निष्कर्मतेच्या जाणिवेचे उगमस्थान. भूकेलेयां–उत्कट जिज्ञासा असलेल्या साधकांना, आत्मज्ञानाची भूक लागलेल्यांना. साधनाची धणि–साधन-साफल्याचे समाधान. धणि–धन्यता. १६०. प्रवृत्ती–कर्माकडे असलेला कल.

१६२. **जेथ वैराग्याचा पांगु फीटे । विवेकाचा ही सोसु तूटे**
**जे न पांतां साहाजें भेटे । आपणापें ।।**

*तद्विद्धि प्रणिपातेन परिप्रश्नेन सेवया ।*
*उपदेक्ष्यंति ते ज्ञानं ज्ञानिनस्तत्त्वदर्शिनः ॥ ३४ ॥*

[ सेवा करूनि ते जाण नम्र-भावे पुसूनिया
ज्ञानोपदेश देतील ज्ञानी अनुभवी तुज ]

१६३. **तें ज्ञान पैं गा बरवें । जैं मनीं आथि जाणावें**
**तैं संतां यया भजावें । सर्वस्वेंसीं ॥**

१६४. **जेयांचा ज्ञानकुरुठा । तेथ साधुसेवा हो दारवठा**
**तो स्वाधीनु करीं सूभटा । अव्लगौनि ।।**

१६५. **जरि तनुमनुजीवें । विचारासि लागावें**
**आणि अगर्वता करावें । दास्य सकल ।।**

१६२. ज्या ठिकाणी वैराग्याची हौस पुरी होते, विवेकाची धाव पूर्ण होते आणि पाहण्याची क्रिया न करताना ज्यामुळे आत्मतत्त्वाचा अनायासे साक्षात्कार होतो;

१६३. असे ते उत्तम ज्ञान मिळवावयाचे तुझ्या मनात असेल तर ह्या (पुढे वर्णन केलेल्या) संतसज्जनांची सर्वभावेकरून सेवा करावी.

१६४. हे अर्जुना, ज्यांच्या ज्ञानरूपी मंदिराचा सज्जनांची सेवा हा उंबरठा आहे, त्याचा आश्रय घेऊन तो तू प्राप्त कर.

१६५. यासाठी तनुमनोजीवाने हा विचार करावा आणि अभिमान सोडून त्यांची सर्व प्रकारे सेवा करावी.

१६१. बोलांचें बोलणें ठेलें-शब्दांचा मर्यादितपणा थांबला. पांगु फिटे-उत्कट इच्छा पूर्ण होते. सोसु तुटे हाव नाहीशी होते. न पांतां भेटे-प्रत्यक्ष पाहण्याची आवश्यकता नसताना दिसते. आपणापें-ऐवजीं आपणपें (आत्मत्व) हा पाठ योग्य. १६१ व १६२ या ओव्यांतून अशा ज्ञानावस्थेत ज्ञेय, ज्ञाता आणि ज्ञान ही त्रिपुटी एकात्मता पावते, असा भाव निघतो. १६३. जैं-जर. मनी आथि-जाणावे-जाणून घ्यावे, असे मनात असेल. १६४. ज्ञानकुरुठा-( कुरुठा कार्य-स्थान) ज्ञानाचे घर. दारवठा-उंबरा, उंबरठा. अव्लगानि ( अव+लग् )-आश्रय घेऊन. १६५. विचारासि लागावे-विचार करावा. ‘ चरणांसी लागावे ’ असा पाठभेद आहे. अगर्वता-निराभिमानपणे.

*यज्ज्ञात्वा न पुनर्मोहमेवं यास्यसि पांडव ।*
*येन भूतान्यशेषेण द्रक्ष्यस्यात्मन्यथो मयि ॥ ३५ ॥*

[ ज्या ज्ञानाने असा मोह न पुन्हा पावशील तू
आत्मात आणि माझ्यात भूते निःशेष देखुनी ]

**१६६. मग अपेक्षित जें आपुलें । तें ही सांगतील पूसिलें**
**जेणें अंतःकरण बोधलें । संकल्पा नैये ॥**

**१६७. जेहाचेनि उजीवडें । जालें चित्त निधडें**
**ब्रह्माचेनि पाडें । निशंक होईल ॥**

**१६८. तेव्हलि आपणपेन सहितें । यें अशेषें हीं भूतें**
**माझां स्वरूपीं अखंडितें । देखसी तूं ॥**

**१६९. ऐसें ज्ञानप्रकाशें पाहिल । तैं मोहांधकारु जाइल**
**जैं गुरुकृपा होइल । पार्था गा ।**

१६६. असे केले म्हणजे ज्या ज्ञानाची आपणास अपेक्षा आहे त्यासंबंधी केलेल्या प्रश्नाचेही ते उत्तर देतील. ते ज्ञान असे आहे की, त्याचा उपदेश मनाला झाल्यावर मन संकल्पहीन होते.

१६७. ज्याच्या प्रकाशामुळे चित्त निर्भय होऊन परब्रह्मासारखे निर्विकल्प होईल.

१६८. असे ज्ञान प्राप्त झाल्यानंतर तू स्वतःला धरून हे सर्व प्राणिमात्र निरंतरपणे माझ्या स्वरूपात पाहशील.

१६९. हे अर्जुना, अशा प्रकारे जेव्हा गुरुकृपा होईल तेव्हा ज्ञानप्रकाशाची पहाट होईल आणि अज्ञानरूपी अंधकार नाहीसा होईल.

१६६. पूसिलें – ( सं– पृच्छ् ) विचारलेले. संकल्पा नैये–संकल्पाकडे येत नाही. संकल्प आणि विकल्प हे मनाचे विकार मानले आहेत, ते नाहीसे होतील असा अर्थ. १६७. उजीवडें- उजेडाने. निधडं- धैर्यवान्, पक्के. पाडें–तुलनेने. निशंक–निर्भय, निर्विकल्प. १६८. आपणपेन सहितें–आपणांसहवर्तमान. अशेषें–सर्व. अखंडितें-निरंतर, अखंडितपणे, केवल स्वरूपात. १६९. पाहिल-उजाडेल. (प्रभा या संस्कृत शब्दापासून )

*अपि चेदसि पापेभ्यः सर्वेभ्यः पापकृत्तमः ।*
*सर्वं ज्ञानप्लवेनैव वृजिनं संतरिष्यसि ॥ ३६ ॥*

[ जरी पाप्यांमधे पापी असशील शिरो-मणी
तरी ह्या ज्ञान-नौकेने पाप ते तरशील तूं ]

१७०. जऱ्हीं कल्मषांचा आगरु । तूं भ्रांतिचा सागरु
व्यामोहाचा डोंगरु । होउनि आहासि ॥

१७१. तऱ्हीं ज्ञानशक्तीचेन पाडें । हें आघवेंचि गा थोकडें
ऐसें सामर्थ्य जेयाचें चोखडें । ज्ञानीं इये ॥

१७२. देखें विश्वसंभ्रमा ऐसा । जो अमूर्तीचा कडवसा
तो जेयाचेया प्रकाशा । पुरे चि ना ॥

१७३. तेया काइसे मनोमल । हें बोलतां चि अति कीडाल
नाहिं येणें पाडें ढिसाल । दूजें जगीं ॥

१७०. जरी तूं पापांची खाण, मोहाचा समुद्र, मूढतेचा पर्वत होऊन राहिलास,

१७१. तरी ज्ञानसामर्थ्याच्या तुलनेने हे सर्व कस्पटाप्रमाणे ठरते. असा या ज्ञानामध्ये उज्ज्वल प्रभाव आहे.

१७२. असे पाहा की, अमूर्त अशा परमतत्त्वाचा विश्वाभासरूपी छोटास उजेड ज्याच्या प्रकाशामध्ये विलीन होतो. (तो गडप होतो.)

१७३. अशा ज्ञानापुढे मनोमलाची काय कथा! अरे मनोमलाचा उल्लेख करताच ते अतिशय हिणकस ( कःपदार्थ ) ठरतात आणि

१७०. कल्मष–किंतु, पाप. भ्रांति–भ्रम, मोह. व्यामोह–किंकर्तव्यमूढता. कल्मष, भ्रांति आणि व्यामोह अशा मोहाच्या पायऱ्या उत्तरोत्तर उत्कर्षाने दाखविल्या असल्यामुळे सार अलंकार. १७१. थोकडें–थिटे, क्षुद्र. चोखडें–शुद्ध, अद्भुत. १७२. विश्वसंभ्रम–विश्व हे खरे असल्याचा आभास. अमूर्तीचा–' अमूर्ताचा ' असा पाठभेद–अव्यक्त अशा आत्म्याचा. कडवसा–छपरातून येणारी तिरीप, ( कवडसा ) म्हणजे अल्प प्रकाश. पुरे चि ना–उरत नाही, नाहीसा होतो. १७३. मनोमल–मनाचे भ्रमजन्य विकार. कीडाल–सोन्यातील हिणकस भाग किंवा मळ. यावरून

*यथैधांसि समिद्धोऽग्निर्भस्मसात्कुरुतेऽर्जुन ।*
*ज्ञानाग्निः सर्वकर्माणि भस्मसात्कुरुते तथा ॥ ३७ ॥*

[ संपूर्ण पेटला अग्नी काष्ठे जाळूनि टाकितो
तसा ज्ञानाग्नी तो सर्व कर्मे जाळूनि टाकितो ]

**१७४. सांघें भूतत्रयाची काजली । जे गगनामाजि उधली**
**तिये प्रलइचिये वाहुंटली । काइ अभ्र पूरे ।।**

**१७५. किं पवनाचेनि कोपें । पाणियें चि जो पलिपे**
**तो प्रलयानलु काइ दडपे । तृणें नावें ॥**

*नहि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यते ।*
*तत्स्वयं योगसंसिद्धः कालेनात्मनि विंदति ॥ ३८ ॥*

[ ज्ञानासम नसे काही पवित्र दुसरे जगी
योग-युक्त यथा-काळी ते पावे अंतरी स्वये ]

ज्ञानाच्या मुकाबल्यात तर जगांत मनोमलासारखे ढिसाळ (आडजात लाकडासारखे धडधड पेटणारे) दुसरे कोणतेही नाही. [ भस्मसात्कुरुते या पुढील श्लोकातील पदाचे भाषांतर. ]

१७४. पृथ्वी, आप आणि तेज या तीन महाभूतांचा धुराडा ज्यावेळी आकाशात उसळतो त्यावेळी त्या प्रलयकालच्या वावटळीत अभ्रे टिकतील काय ? सांग बरे. (वायुप्रलयात भूतत्रयाचा धूर देखील नाहीसा होतो त्याप्रमाणे ज्ञानप्रलयात त्रिविध कर्माची फले आणि त्याबरोबर त्यांचे मलरूपी मेघ देखील नाहीसे होतात).

१७५. किंवा प्रलय-काळचा अग्नी सोसाट्याच्या वाऱ्याच्या प्रकोपाने प्रत्यक्ष पाण्याला देखील जाळून टाकतो तो क्षुल्लक तणकटाने दडपला जाईल काय ? ( ज्ञानरूपी अग्नीपुढे कर्मरूपी तृणाचे नावही उरत नाही.)

लक्षणेने हे बोलणेच मुळी संकुचितपणाचे आहे असा अर्थ. ढिसाळ—बोजड परंतु ढिसूळ, लौकर भस्मसात् होणारे. १७४. भूतत्रयाची काजळी—पृथ्वी, आप आणि तेज या महाभूतांचा धूर. 'उधली' ऐवजी 'उधवली' असा पाठभेद; उसळली असा अर्थ. वाहुंटली—वावटळ, सोसाट्याचा वारा. प्रलय—अंतकाळ. पुराणामध्ये जगाचा प्रलय होण्याचा जो प्रकार सांगितला आहे त्यानुरूप. १७५. पाणियें चि—पाण्यालाच. पलिपे—जाळतो. नावें—क्षुल्लक.

१७६. म्हणौनि असो हें न घडे । जें विचारितां चि असंघडे
पुडुतीं ज्ञानाचेनि पाडें । पवित्र न दिसे ।।

१७७. एक ज्ञान ही उत्तम होये । आणिक ही येथ तैसें चि आहे
तरि सांगें चैतन्य कां नोहे । दूसरें गा ।।

१७८. ना तरि महातेजाचेनि कसें । चोखाल प्रतिबिंब दीसे
कां गवसलें गवसे । आकाश हें ।।

१७९. ना तरि पृथ्वीचेनि पाडें । कांटालें जरि जोडे
तरि ज्ञानासि उपमा घडे । पांडुकुमरा ।।

१८०. म्हणौनि बहुतीं परी पाहातां । पुडुतीं पुडुतीं निर्द्धारितां
हे ज्ञानिची पवित्रता । ज्ञानीचि आथि ।।

१७६. म्हणून हे घडू शकत नाही. कारण की विचार केला असता ते विसंगत आहे. शिवाय असे की, ज्ञानाच्या तुलनेने ( या जगात ) पवित्र असे काही दिसत नाही.

१७७. या जगात ज्ञान हीच एक उत्तम गोष्ट आहे. आणखी एक तशीच गोष्ट आहे (चैतन्य). मग ज्ञान म्हणजे दुसरे चैतन्यच नव्हे काय ? हे सांग बरे.

१७८. किंबहुना, महातेजाच्या कसोटीला जर त्याचे प्रतिबिंब चोखपणे उतरेल किंवा जे दिसत आहे तसे आकाश दुसरे सापडेल तर—

१७९. किंवा पृथ्वीच्या तोडीचे दुसरे वजन मिळाले तरच हे अर्जुना, ज्ञानाला उपमा देता येईल.

(सूर्य, आकाश व पृथ्वी ह्या जशा निरुपमेय आहेत तसेच ज्ञानही निरुपमेयच आहे हा भावार्थ. )

१८०. म्हणून पुष्कळ प्रकारांनी पाहिले असता, पुनःपुनः विचार केला असता (असेच ठरते की) ज्ञानाची पवित्रता ज्ञानाच्याच ठिकाणी आहे. (इतरत्र नाही.)

---

१७६. विचारितां—विचार केला असता. असंघडे—असंगत. १७७. 'येथ...आहे' ऐवजी 'एक तैसें के आहे' असा पाठभेद आहे. चैतन्य—चित्तत्व, आत्मा. १७८. महातेज—सूर्य. कसें दीसे—कसोटीला उतरते. चोखाल—स्पष्ट. गवसलें—सापडले, दिसले. गवसे—दुसरे सापडेल काय ? १७९. कांटालें—( काटा—तराजू )—त्यात घालावयाचे ते, वजन. १८०. 'ज्ञानिची' ऐवजी 'ज्ञानाची' असा पाठभेद आहे.

**१८१. जैसी अमृताची चवि निवडिजे ।**
**तरि अमृता चि सारिखी ह्मणिजे**
**तैसें ज्ञान हें उपमिजे । ज्ञानेंसीं चि ॥**

**१८२. आतां ययावरि बोलणें । वायां चि वेलु फेडणें**
**तवं साच जी हें पार्थु म्हणे । बोलिजत असां ॥**

**१८३. परि तेंचि ज्ञान केवि जाणावें । ऐसें जवं अर्जुनें पूसावें**
**तवं तें मनोगत देवें । जाणीतलें ॥**

*श्रद्धावांल्लभते ज्ञानं तत्परः संयतेंद्रियः ।*
*ज्ञानं लब्ध्वा परां शांतिमचिरेणाधिगच्छति ॥ ३९ ॥*

[ श्रद्धेने मेळवी ज्ञान संयमी नित्य-सावध
ज्ञानाने शीघ्र तो पावे शांती शेवटची मग ]

**१८४. मग ह्मणतसे किरीटी । आतां चित्त देइं इये गोठी**
**सांघैन ज्ञानाचिये भेटी । उपावो तुज ॥**

१८१. ज्याप्रमाणे अमृताची चव शोधावयाची झाल्यास ती अमृता-सारखीच म्हणावी लागते, त्याप्रमाणे ज्ञानाला ज्ञानाचीच उपमा द्यावी लागते.

१८२. आता यापेक्षा अधिक बोलणे म्हणजे व्यर्थ वेळ घालविणे आहे. तेव्हा अर्जुन म्हणाला, "देवा, आपण म्हणता तेच खरे."

१८३. "परंतु हे ज्ञान कसे ओळखावे ?" असा प्रश्न जेव्हा विचारावा असे अर्जुनाने मनात आणले तेव्हा त्याच्या मनातील प्रश्न देवांनी ओळखला.

१८४. मग (श्रीकृष्ण) म्हणाला– अर्जुना, या गोष्टीकडे तू आता लक्ष दे. ज्ञान मिळवण्याचा उपाय तुला सांगतो.

---

१८२. वेलु फेडणें–काळाचा अपव्यय करणे. बोलिजत असा–कर्मणि रूप. तुमच्याकडून बोलले जात आहे. १८४. उपावो–आजच्या वऱ्हाडीप्रमाणे ज्ञानेश्वरीतही संस्कृतातील 'य' चा 'व' होतो. ज्ञानाचिये भेटी–या ठिकाणी 'भेटणे' हे क्रियापद व्यक्तीच्या ऐवजी आजच्या वऱ्हाडीप्रमाणे वस्तूंच्या बाबतीत लावले आहे.

१८५. तरि आत्मसुखाचिया गोडिया । विटला जो विषयां
जेयाचां ठांइं इंद्रिया । मानु नाहीं ।।

१८६. जो मनासि चाड न संघे । जेयां प्रकृतिचें केलें ने घे
जो श्रद्धेचेनि संभोगें । सुखिया जाला ।।

१८७. तेयातें चि गिवसित । हें ज्ञान पावे निश्चित
जेयामाजि अचुंबित । शांति असे ।।

१८८. तें ज्ञान हृदयीं प्रतिष्ठे । आणि शांतिचा अंकुरु फूटे
मग विस्तारु बहुत प्रकटे । ततक्षणीं ।।

१८९. तेव्हां जेउति वांस पाहिजे । तेउति शांती चि एकि देखिजे
तेथ पारावार नेणिजे । निर्द्धारितां ।।

१८५. आत्मसुखाची गोडी चाखल्यामुळे जो विषयसुखांना विटला आहे, ज्याच्या ठिकाणी इंद्रियसुखांना महत्त्व नाही;

१८६. जो मनाला आपल्या इच्छा सांगत नाही, जो आभासात्मक गोष्टींचा स्वीकार करीत नाही आणि जो श्रद्धेशी संलग्न होऊन सुखी झाला आहे;

१८७. अशा ज्या माणसाच्या ठिकाणी निरंतर शांती भरली आहे त्यालाच शोधीत शोधीत ज्ञान हे निश्चयेकरून येऊन पोहचते.

१८८. ते ज्ञान हृदयात स्थिर होते आणि मनाची समावस्था अंकुरित होते. मग त्या अंकुराचा त्या क्षणापासून विस्तार होऊ लागतो.

१८९. अशावेळी, तो ज्या ज्या दिशेला पाहतो तेथे तेथे त्याला केवळ शांतीच दिसते आणि सूक्ष्मतेने पाहता आपपरभाव नाहीसा होतो.

---

१८५. मानु नाहीं–इंद्रियांचे चोचले पुरविले जात नाहीत. १८६. न संघे–सांगत नाही. संकल्पविकल्पापलीकडे गेला आहे असा भाव. प्रकृतिचें केलें–मायारूप, आभासात्मक. संभोग–संलग्नता. १८७. गिवसित–शोध करीत. अचुंबित–एकरूपता. या सर्व ओव्यांत श्रद्धेच्या संभोगाचे सुख घेणारा मनुष्य शांती (आत्मानंदा)–शी केवळ चुंबाचुंबी करीत नाही तर तिच्याशी एकरूप होतो. १८८. ‘ततक्षणीं’ ऐवजी ‘आत्मबोधाचा’ असा पाठ आहे. १८९. वांस पाहिजे–वाट पाहावी. पारावार–(पर + अपर ) तुझें-माझें.

**१९०. ऐसा हा उत्तरोत्तरु । ज्ञानबीजाचा विस्तारु**
**हा सांगतां असे अपारु । परि असो आतां ॥**

*अज्ञश्चाश्रद्दधानश्च संशयात्मा विनश्यति ।*
*नायं लोकोऽस्ति न परो न सुखं संशयात्मनः ॥ ४० ॥*

[ नसे ज्ञान नसे श्रद्धा संशयी नासला पुरा
न हा लोक न तो लोक न पावे सुख संशयी ]

**१९१. आइकें जेया प्राणियांचा ठांइं । यया ज्ञानाचें पाहिलें नाहिं**
**तेयाचें जियालें ह्मणों काइ । वरि मेलें चांग ॥**

**१९२. शून्य जैसें गृह । कां चैतन्येंवीण देह**
**तैसें जीवीत तें संमोह । ज्ञानहीन ॥**

**१९३. अथवा ज्ञान कीर आपु नोहे । परि तें चाड येकि जऱ्हीं वाहे**
**तेथ जीवाला काहीं आहे । प्राप्तिचा ॥**

१९०. असा ज्ञानरूपी बीजाचा अधिकाधिक होणारा विस्तार वर्णन केल्यास अपरंपार आहे ! म्हणून तूर्त पुरे.

१९१. ज्या लोकांच्या ठिकाणी अशा ज्ञानाचा उदय झाला नाही त्यांच्या जिण्याला काय म्हणावे ? त्यापेक्षा मेलेले बरे !

१९२. ज्याप्रमाणे घर ओसाड असावे, शरीरात जीव नसावा, त्याप्रमाणे ज्ञानावाचून असलेले जिणे ते केवळ व्यर्थ होय.

१९३. किंबहुना, ज्ञान हे खरोखरी आत्मसात् झाले नाही परंतु त्याच्या प्राप्तीची निदान चाड जरी बाळगली तरी त्याला ज्ञान प्राप्त करून घेण्याचा थोडासा जिव्हाळा असतो.

---

१९०. ज्ञानबीजाचा विस्तारु–हा सांगण्याच्या निमित्ताने ३९ व्या श्लोकावरील टीकेत ज्ञानवान् माणसाच्या आत्मानंदरूपी संसारसुखाच्या अवाढव्य विस्ताराचे वर्णन केले आहे. पाहा—अवघाचि संसार सुखाचा करीन । आनंदें भरीनें तिन्ही लोक ॥ १९१. पाहिलें–प्रभात, उदयकाळ. जियालें–जीवन. १९२. शून्य–वसतिहीन. संमोह–भ्रामक, आभासमय. १९३. किर–खरोखर. आपु–आपलेसे. चाड–जिज्ञासा. जीवाला ( जीवालय )–जिव्हाळा, आस्था.

१९४. वांचूनि ज्ञानाची गोठि काइसी ।
परि ते आस्था ही न धरी जी मानसीं
तो संशयरूप हुताशीं । पडिला जाण ।।

१९५. जें अमृत ही परि नावडे । ऐसें संवियां चि अरोचक जें पडे
तें मरण आलें असें फुडें । हें जाणों ये कीं ।।

१९६. तैसा विषयसुखरजें । जो ज्ञानेंसीं चि माजे
तो संशइं अंगिकरिजे । एथ भ्रांति नाहीं ।।

१९७. मग संशइं जरि पडिला । तरि निभ्रांत जाणें नाशला
तो अहिकाही परि मूकला । सुखासि गा ।।

१९४. जिव्हाळ्यावाचून ज्ञान मिळेल ही तर गोष्ट सोडूनच दे. परंतु जिव्हाळाही ज्याच्या मनात नाही असा मनुष्य संशयाग्नीमध्ये पडला आहे असे तू समज.

१९५. साक्षात् अमृतदेखील आवडत नाही अशी ज्याच्या स्वभावात अरुची उत्पन्न झाली आहे त्याच्या बाबतीत मरणच ओढवले आहे हे उघड कळून येते.

१९६. त्याप्रमाणे विषयाच्या क्षुल्लक सुखामुळे जो ज्ञानाला तुच्छ लेखतो तो संशयाने झपाटला गेला आहे, त्या बाबतीत शंका नको.

१९७. अशा रीतीने संशयात जो पडला तो निश्चितपणे नाश पावला असे समज. शिवाय तो विषयसुखालाही आचवतो.

---

१९४. वांचूनि ( वञ्च् )–सोडून. हुताश–(हुतमश्नाति इति ) अग्नी. १९५. संवियां–स्वभावें, सहज. अरोचक पडे–अनावड उत्पन्न होते. फुडे–(स्फुट)–स्पष्ट, उघड. १९६. विषयसुखरजें–इंद्रियजन्य आनंदाचा अंश, त्याने. ‘ विषयसुखें रंजे ’ असा पाठभेद. माजे–गर्व धरतो. ज्ञानापेक्षा विषयसुख श्रेष्ठ मानतो. अंगिकारिजे–स्वीकारला जातो ( कर्माणि रचना ). १९७. अहिकाही–ऐहिक ( येथील ) विषयसुखालाही देखील.

**१९८. जेया कालज्वरु आंगीं बाणे । तो शीतोष्णें जैसीं नेणे**
**आगि आणि चांदिणें । सरिसें चि मानीं ।।**

**१९९. तैसें साच आणि लटिकें । वीरूं अथवा नीकें**
**संशइं तो नोलखे । हिताहितें ।।**

**२००. हा रातिदिवसु पाहिं । जैसा जात्यंधा ठाउवा नाहीं**
**तैसें संशैया सत्य काहीं । मता नै ये ।।**

**२०१. म्हणोनि संशयाहूनि थोर । आणिक पाप नाहिं घोर**
**हा विनाशाची वागुर । प्राणियांसि ।।**

*योगसंन्यस्तकर्माणं ज्ञानसंछिन्नसंशयम् ।*
*आत्मवन्तं न कर्माणि निबंध्नन्ति धनंजय ॥ ४१ ॥*

[ योगाने झाडिली कर्मे ज्ञाने संशय तोडिले
जो सावधान आत्म्यात कर्मे त्यास न बांधिती ]

१९८. ज्याच्या अंगात भयानक ताप भरला आहे त्याला ज्याप्रमाणे थंड आणि उष्ण यातील फरक कळत नाही आणि तो अग्नी आणि चंद्रप्रकाश समसमान मानतो.

१९९. त्याप्रमाणे संशयात पडलेल्या मनुष्यास खरे आणि खोटे, अयोग्य आणि योग्य, हित आणि अहित यांची ओळख पटत नाही.

२००. ज्याप्रमाणे जन्मांधाला रात्र आणि दिवस यांची जाणीव राहत नाही, त्याप्रमाणे संशयी माणसाला सत्य असे काही पटतच नाही.

२०१. म्हणून संशयापेक्षा अधिक भयानक असे दुसरे मोठे पातक नाही. प्राणिमात्राला संशय हा विनाशाचे जाळेच आहे.

---

१९८. कालज्वरु—मरणकाळचा ताप. आगि—अग्नी, ऊन्ह. १९९. साच—(सत्य—सच्च—साच) खरे. लटिकें—खोटे. वरिूं—( वैर ) प्रतिकूल भाव. नीकें—अनुकूल. २००. पाहिं—पाहा, लक्षात घे. ठाउवा—ज्ञात, ठाऊक. संशैया—( संशयिन् )—संशयग्रस्त. २०१. वागुर—( वाक + दोर ) जाळे.

२०२. ह्मणोनि हा त्यजावा । हाचि येकु जीणावा
जो ज्ञानाचिया अभावा- । माजि असे ॥

२०३. जैं अज्ञानाचें गडदे पडे । तैं हा बहुवसु मनीं वाढे
ह्मणौनि सर्वथा मार्गु मोडे । विश्वासाचा ॥

*तस्मादज्ञानसंभूतं हृत्स्थं ज्ञानासिनात्मनः ।*
*छित्त्वैनं संशयं योगमातिष्ठोत्तिष्ठ भारत ॥ ४२ ॥*

[ म्हणूनि अंतरांतील अज्ञान-कृत संशय
तोडुनी ज्ञान-खड्गाने ऊठ तू योग साधुनी ]

२०४. हृदइं हाचि न समाए । आणि बुद्धितें गवसूनि ठाए
तेथ संशयात्मक होए । लोकत्रय ॥

२०५. ऐसा ही जऱ्हीं थोरावे । तऱ्हीं उपायें येकें आंगवे
जरि हातीं होये बरवें । ज्ञानखड्ग ॥

२०२. म्हणून ज्ञानाच्या अभावात राहणारा हा संशय तू सोडून दे आणि या एकट्या संशयालाच ( तू पहिल्याप्रथम ) जिंकून घे.

२०३. ज्यावेळी अज्ञानाचा गडद अंधार पडतो. त्यावेळी हा मनामध्ये फार पसरतो आणि अशा रीतीने श्रद्धेचा मार्ग सर्वस्वी खुंटतो.

२०४. हा हृदयात सुद्धा मावेनासा होतो, बुद्धीला ग्रासून टाकतो आणि मग सगळे जग ( अशा माणसाला ) संशयमय दिसते.

२०५. हा असला माजला तरी एका उपायाने स्वाधीन होतो. आणि जर हातामध्ये ज्ञानरूपी तीक्ष्ण खड्ग असेल —

---

२०२. जीणावा-जिंकला जावा. कर्माणि प्रयोग. अभावामाजि-अज्ञानातून उत्पन्न होणारा. माजि-मध्ये. २०३. गडदे-गर्द, दाट. विशेषणाचा नामासारखा उपयोग. बहुवसु-बहुवश, आत्यंतिकपणे. मार्ग मोडणे-नाहीसें करणे. २०४. न समाए-मावत नाही, समाविष्ट होत नाही. गवसूनि ठाए-( गवेषण ) ग्रासून घेतो. २०५. थोरावे-एकदम वाढतो. आंगवे-कब्जात सापडतो.

**२०६. तरि तेणें ज्ञानशस्त्रें तीखटें । निखलु हा निवटे**
**मग निःशेष स्वता फिटे । मानसिचा ॥**

**२०७. या कारणें पार्था । उठीं वेगी वरौता**
**नाशु करूनि हृदयस्था । संशयासि ॥**

**२०८. ऐसें सर्वज्ञाचा बापु । जो कृष्णु ज्ञानदीपु**
**तो ह्मणतसे सकृपु । आइकें राया ॥**

**२०९. तवं एया पूर्वापर बोलाचा । विचारूनि कुमरु पांडुचा**
**कैसा प्रश्नु हान अवसरिचा । करिता होईल ॥**

२०६. तर त्या तीक्ष्ण अशा ज्ञानरूपी शस्त्राने हा संशय समूळ छेदून टाकता येतो ,आणि नंतर तो मनामधून संपूर्णतया आपणहून नष्ट होतो. (किंवा इतर प्रतीतील खता किंवा खात ( क्षत ) असा पाठ घेतल्यास–संशयाची मनाला झालेली जखम नाहीशी होते. )

२०७. यासाठी हे अर्जुना, तू हृदयातील संशयाचा नाश करून लवकर (युद्धासाठी ) सिद्ध हो.

२०८. सर्व ज्ञान्यांमध्ये श्रेष्ठ असलेला असा जो ज्ञानाचा दीपक श्रीकृष्ण तो कृपावंत होऊन जे म्हणाला ते, धृतराष्ट्रा, तू ऐक.

२०९. त्यानंतर श्रीकृष्णाच्या पूर्वीच्या आणि आताच्या भाषणाचा विचार करून अर्जुन कशा प्रकारचा समयोचित प्रश्न करील—

(हे पुढे पाहा—)

---

२०६. तीखटें–तीक्ष्ण. तिक्त याचेंही मराठीत तिखट असेच रूप होते. निखलु–निखालस, निव्वळ. निवटे–निपटला जातो, नाहीसा होतो. स्वता–आपण होऊन, स्वतः होऊन, राजीखुषीने. इतर प्रतीत खता ( क्षत ) असा पाठभेद आहे. फिटे–नाहीसा होतो. २०७. ' वेगा ' सरकारी प्रत. वरौता उठीं–सिद्ध होऊन उभा राहा किंवा वरौता म्हणजे त्यानंतर असाही अर्थ करता येईल. २०८. बापु (कानडी)–श्रेष्ठ. २०९. पूर्वापर–आधीचा आणि नंतरचा. विचारूनि–विचार करून. हान अवसरिचा–दुसऱ्या वेळचा, पुनः. २०९ नंतर काही प्रतींत एक ओवी जास्त आहे ती अशी—ते कथेची संगती । भावांची संपत्ति । रसांची उन्नति । म्हणिजैल पुढां ॥

**२१०. जेयाचां बरवेपणीं । कीजे आठां रसांची ओलावणी**
**जो सज्जनाचिये आणी । विसावां जगीं ॥**

**२११. तो शांतू चि अभिनवैल । ते परियसां मऱ्हाटे बोल**
**जे समुद्रा ही हूनि खोल । अर्थभरित ॥**

२१०. ज्याच्या चांगुलपणाने ( साहित्यशास्त्रातील ) आठही रसांना ओलावा दिला जातो आणि जो सज्जनांच्या बुद्धीला इहलोकात विसावा होतो.

२११. तो साक्षात् शांत रस ( आता ) अभिनव रीतीने प्रगट होईल. ज्यांमध्ये समुद्रापेक्षाही सखोल अर्थ भरला आहे ते मराठी शब्द श्रवण करा.

२१०. आठ रस—शृंगार, वीर, करुण, अद्भुत, हास्य, भयानक, बीभत्स, रौद्र. ओलावणी—आर्द्रता, ओले करणे. अभिनवगुप्ताने शांत रसाचे प्रतिपादन करतांना आठही रसांच्या मुळाशी शांत रसाचे तत्त्वच अधिष्ठित आहे आणि सर्व रसांचा आस्वाद हा शांतप्राय आहे असे म्हटले आहे. या दृष्टीने ज्ञानेश्वरांनी शांत रसाच्या या वैशिष्ट्यामुळे तो इतर आठही रसांना ओलावा देतो असे म्हटले आहे. जणू काही शांत रसाचा ओलावा नसेल तर बाकीचे रस शुष्क होतील, त्यांत रसत्वच राहणार नाही, असे त्यांना सुचवावयाचे आहे. अभिनवगुप्तानेच शांत रसाचे वर्णन 'सर्वरसेभ्यः प्रधानतमः' असे केले आहे. ओलावणी याऐवजी सांप्रदायिक प्रतीत 'ओवाळणी' असा पाठ आहे. तेथेही शांत रसावरून इतर आठही रस ओवाळून टाकावे इतके त्याचे महत्त्व आहे, हा अर्थ वरील अर्थाशी सुसंगतपणेच करता येतो. परंतु ज्ञानेश्वरांना 'रस' या शब्दावर कोटी करावयाची असून त्या दृष्टीने त्यांना 'ओलावणी' हाच पाठ अभिप्रेत दिसतो. आणी—अणी, टोक यावरून लक्षणेने बुद्धी असा अर्थ. इतर प्रतीत 'आयणी' असा पाठ आहे. प्रत्ययविरहित चतुर्थी. विसावां—( विश्राम-सं. ) विश्रांती. संस्कृत साहित्यशास्त्रात रस हे संविद्-विश्रांतिस्थान मानले आहेत. २११. अभिनवैल—अभिनव या विशेषणावरून 'नावीन्यपूर्ण प्रगट होणे' अशा अर्थाचा धातु. अभिनवगुप्ताचे शांतरस-स्थापनेच्या बाबतीतले

२१२. जैसें बिंब तरि बचकेयेवडें । परि प्रकाशा त्रैलोक्य थोकडें
शब्दाचि व्याप्ति तेणें पाडें। अनुभवावी ।।

२१३. ना तरि कामितेयाचिया इच्छा । फळे कल्पवृक्षु जैसा
बोलु व्यापकु होये तैसा । तरि अवधान देयावें ।।

२१४. हें असो काये म्हणावें । सर्वज्ञ जाणती स्वभावें
तऱ्हीं नीकेनि चित्त देयावें । हे विनती माझी ।।

२१२. जसे सूर्याचे बिंब पाहू गेले तर बचकेएवढे दिसते; परंतु त्याच्या प्रकाशास त्रैलोक्यही अपुरेच पडते, त्याच्या तुलनेने (मराठी) शब्दांचा व्यापक अर्थ अनुभवावा.

२१३. किंबहुना मागणाऱ्याच्या इच्छेप्रमाणे जसा कल्पवृक्ष फळ देतो तसाच मराठी शब्दाचा व्यापकपणा आहे म्हणून तुम्ही (श्रोत्यांनी) लक्ष-पूर्वक ऐकावे.

२१४. पण हे काय सांगावयास पाहिजे ? सर्वज्ञ आहेत ते आपोआप जाणतातच. तरी पण नीटपणे लक्ष द्यावे एवढीच माझी विनंती आहे.

अनन्यसाधारण कार्य लक्षात घेता 'अभिनवेल' या नामधातूवरून येथे ज्ञानेश्वरांनी जणू काही अभिनवगुप्ताचाच नामनिर्देश केला आहे असा भास होतो ! मऱ्हाटे बोल- ज्ञानेश्वरांनी मऱ्हाठी भाषेत सांगितलेला गीतार्थ. अर्थभरित-अर्थाने भरलेले, समुद्राहीहूनि खोल हे विशेषण 'अर्थ' या पदाकडे जोडावे लागते. ज्यांमध्ये समुद्रापेक्षाही गंभीर अर्थ भरला आहे असे मराठी शब्द. परियसां-(परिश्रवण) ऐका. २१२. बचक-(स्त्रीलिंगी)-पालथा कमलाकार हात. सूर्यबिंब साधारणतः अशा आकाराएवढे दिसते. थोकडें-( स्तोक )-अपुरे, लहान. शब्दाची व्याप्ती...अनुभवावी-ज्याप्रमाणे सूर्यबिंब हे पालथ्या पंजाएवढे लहानसे दिसत असले तरी प्रकाशाच्या बाबतीत मात्र त्रैलोक्य म्हणजे संपूर्ण विश्वही त्याला कमीच पडते. त्याप्रमाणे मराठी भाषेच्या शब्दाशब्दांत व्यापक अर्थ अनुभवास येतो. ज्ञानेश्वर सहाव्या अध्यायात म्हणतात-तैसें शब्दाचें व्यापकपण । देखिजे असाधारण । पाठेयां भावज्ञां फावति गुण । चिंतामणिचे ।। २१३. कामितेया-चिया-कामित, इच्छा करणारा, त्याच्या इच्छेने. २१४. नीकेनि-(निका)-काळजीपूर्वक.

२१५. जें साहित्य आणि शांती । हे रेखा दिसे बोलती
जैसी लावण्यगुणयुवती । आणि पतिव्रता ।।

२१६. आदि चि साखर आवडे । आणि ते चि जरि ओखधा जोडे
तरि न सेवावी कां कोडें । नावां नावां ।।

२१५. ज्याप्रमाणे लावण्य आणि सद्गुण यांनीं युक्त असलेली तरुणी पतिव्रताही असावी त्याप्रमाणे ही बोलण्याची ( जिवंत बोलकी ) शैली काव्यशोभेच्या साहित्यादी गुणांनी युक्त असून शिवाय शांतरसपरिपूर्णही दिसते.

२१६ आधीच साखर ही आवडती आणि शिवाय ती जर औषधाबरोबर दिली, तर ती पुनःपुनः आनंदाने का खाऊ नये ?

२१५. साहित्य–शब्दार्थौ सहितौ काव्यम् । या व्याख्येवरून काव्य या अर्थाचा असलेला 'साहित्य' हा शब्द ज्ञानेश्वरीत काव्यशोभेचे धर्म ( गुण, रीति, अलंकार इ. ) या अर्थाने वापरलेला आहे. काव्यशोभेची प्रसाधन-सामग्री. शांति–काव्याचा आत्मा असलेला शांत हा रस. रेखा–चित्रांतील बाह्य रेषा या मूळार्थावरून लक्षणेने काव्यातील सौंदर्य व्यक्त करणारी शैली असा अर्थ. इतर टीकाकारांनी काव्यरचना असा अर्थ केला आहे. बोलती–बोलकी, बोलण्याची, वक्तृत्वाची, चालती-बोलती, जातिवंत, जिवंत असा अर्थ. लावण्यगुणयुवती–लावण्याने व गुणांनी युक्त असलेली तरुण स्त्री. या ठिकाणी इतर प्रतींत 'लावण्यगुणकुळवती' असा पाठ आहे. त्यावरून लावण्य, गुण, कुळ यांनी युक्त असलेली असा अर्थ करता येतो, परंतु 'युवती' असून 'पतिव्रता' असणे हा भाव राजवाडे–प्रतीतील पाठामुळे स्पष्ट होतो. लावण्य, गुण, यौवन ह्या बाह्य लक्षणांनी अन्वित असलेल्या स्त्रीचे पातिव्रत्याच्या आत्मिक गुणाने जसे महत्त्व प्रस्थापित होते त्याप्रमाणे साहित्य (अलंकारादि) हा बाह्यगुण आणि शांतरस हा आत्मा यांमुळे वक्तृत्वाची शैली भारदस्त दिसते असा भाव ज्ञानेश्वरांना सूचित करावयाचा आहे. साहित्य ही प्रसाधन-सामग्री आणि शांतरस हा काव्याचा आत्मा हे साहित्यशास्त्रीय तत्त्व तेथे स्पष्ट झाले आहे.

२१६. ओखधा–औषधाला. कोडें–कोडकौतुकाने. नावां नावां–पुनः पुनः.

२१७. साहाजें मलयानीलु सुंदु । तेया ही होये अमृताचा स्वादु
आणि तेथ चि जोडे नादु । दैवंगत्या ।।

२१८. तरि स्पर्शें सर्वांग जीववी । स्वादें जीभेतें नाचवी
तेंवि चि कानाकरवि ह्मणवी । बापु माझा ।।

२१९. तसें कथेचें इये आइकणें । एक श्रवणासि होये पारणें
आणि संसारदुःखा मोकलवणें । विकृतीविण ।।

२१७. आधीच वारा मलय पर्वतावरून वाहावा, ( सुंद म्हणजे कुंद नसलेला वाहणारा असा अर्थ) त्याला अमृताचीही चव यावी आणि शिवाय दैवगतीने त्याला सूरही लाभावा;

२१८. असा वारा ज्याप्रमाणे आपल्या स्पर्शाने अंगप्रत्यंगाला सुखवितो आणि जिभेला आपल्या चवीने नाचावयाला लावतो ( वेड लावतो ) आणि कानांकडून " वा ! वा ! छान " असे उद्गार वदवितो.

२१९. त्याप्रमाणे या कथेचे श्रवण म्हणजे कानाचे एकदम पारणे फिटते आणि अनायासे संसारताप घालविता येतो.

---

२१७. साहाजें–मूळचाच. सुंदु–कुंद (कोंदट) नसलेला, वाहणारा. 'मंदु' सरकारी प्रत. इतर प्रतीत या ठिकाणी 'सुगंधु' असा पाठ आहे. मलयानिल हा सुगंधित असतो हे वेगळे सांगण्याची काय आवश्यकता ? म्हणून राजवाडे प्रतीतील 'सुंदु' या पाठाने निर्वाह होऊ शकतो. नादु–स्वर, सूर. २१८. जीववी–प्राण ओततो, सुखवितो. बापु म्हणवी–धन्योद्गार काढावयास लावतो. २१७ व २१८ या ओव्यांत मलय पर्वतावरून वाहणारा वारा, उत्तम प्रकारची चव व सुस्वर घेऊन ज्याप्रमाणे आपले अंगप्रत्यंग ( त्वचा ), जिव्हा आणि कर्ण सुखवितो त्याप्रमाणे ज्ञानेश्वरीकथेचे श्रवण देखील आत्यंतिक सुखकारक आहे असा भाव. २१९. पारणें होये–हौस फिटते. मोकलवणें–मुक्त करणे, घालविणे. विकृतीविण–स्वाभाविकपणे, आपोआप. मुक्तीच्या इतर मार्गांत काही विकृति निर्माण होतात; तशा गीताश्रवणात नाहीत.

२२०. जरि मैत्रें चि वैरी मरे । तरि वायां कां बांधावे कटारे
रोगु जाये दूधें ओंगरें । तरि नींबु कां पियावा ।।

२२१. तैसा मनाचा मारु न करितां । इंद्रियां दुःख नेंदितां
एथ मोक्षु असे आइकतां । श्रवणांमाझि ।।

२२२. ह्मणौनि आथिलिया आराणुका । गीतार्थु हा नीका
ज्ञानदेउ ह्मणे आइकां । निवृत्तिदासु ।।

*ॐ तत्सदिति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे* **ज्ञानयोगो** *नाम* **चतुर्थोऽध्यायः** ॥

*॥ श्रीसर्वात्मकरामकृष्णार्पणमस्तु ॥*

२२०. जर केवळ मैत्रीनेच वैरी नष्ट होतो (त्याचे शत्रुत्व नाहीसे होते) तर मग त्याला मारून टाकण्यासाठी हातात कट्यार कशाला घ्यावी ! जर रोग हा केवळ दूधभातामुळे नाहीसा होत असेल तर ( त्यासाठी ) कडुनिंबाच्या पाल्याचा रस कशाला प्यावा ?—

२२१. तद्वत् मनाचा कोंडमारा न करता, इंद्रियांना तकलीफ न देता या ठिकाणी केवळ कानांनी ऐकल्यामुळेच (आपोआप) मोक्ष मिळतो.

२२२. म्हणून "तुम्हाला समाधान पाहिजे असल्यास हा गीतार्थच योग्य आहे. याकरिता तुम्ही तो ऐका" असे निवृत्तिनाथांचे शिष्य ज्ञानदेव म्हणतात.

२२०. मैत्रें—स्नेहभावाने. इतरत्र 'मंत्रें' असा पाठ. तेथे मंत्रशक्तीच्या साह्याने शत्रूचा निःपात होतो असा अर्थ घ्यावा लागतो. त्यापेक्षा वैऱ्याला प्रेमाने जिंकावे हा अर्थ जास्त चांगला वाटतो. कटारे—कट्यार. बांधावे—कट्यार कमरेला किंवा हाताला बांधण्याची पद्धत असे. ओंगरें-भाताने. 'साखरें' असाही पाठ आहे. नींबु कडुनिंबाच्या पाल्याचा रस हा तापादी विकारांवर उत्तम उपाय आहे. ११. मारु—त्रास, कष्ट. मनाला त्रास, कष्ट न देता असा अर्थ. नेदिता—न देता. आइकतां—ऐकताक्षणी, श्रवणमात्रे. आइता (आयता) असा पाठभेद आहे. २२२. आथिलिया—(अस्ति) प्राप्त करावयाच्या असल्यास. आराणुका— ( आ + रसु + नूक ) समाधान, विश्रांती.

गीतार्थु–गीता ही संस्कृतात असल्यामुळे ती सर्वांना समजणे शक्य नव्हते म्हणून ज्ञानेश्वरानी तिचे मराठीत 'आबालसुबोध' असे भाषांतर केले. ज्ञानेश्वर अठराव्या अध्यायात म्हणतात–या कारणें मियां । गीतार्थु मऱ्हाटिया । केला लोकां लागिया । दीठिचा विखो ।। १७१४.

संपूर्ण 'ज्ञानेश्वरी'त ज्ञानेश्वरीला उद्देशून दुसरे कोणतेही ग्रंथनाम आढळत नाही. 'गीतार्थ' हेच ज्ञानेश्वरप्रणीत नामाभिधान ! ज्ञानेश्वरांनी किंवा ज्ञानदेवांनी लिहिली ती ज्ञानेश्वरी किंवा ज्ञानदेवी असे नाव रूढ झाले. ज्ञानदेॐ––ज्ञानेश्वरीत ज्ञानेश्वर असे कर्त्याचे नावच नाही! ते स्वतःला उद्देशून सर्वत्र 'ज्ञानदेॐ' असेच म्हणतात. निवृत्तिदासु–ज्ञानेश्वरांचे वडील बंधू निवृत्तिनाथ. हेच त्यांचे गुरु व ज्ञानेश्वरांच्या श्रोतृगणातील प्रमुख होते. ज्ञानेश्वरांनी स्वतःला निवृत्तिदास म्हणवून गुरुविषयी आदर व्यक्तविला आहे.

